For Matric and S. F. Students.

# अनुवादविचार.

## ( Paraphrase Text Book. )

( उदाहरणें व अभ्यासासाठीं गद्यपद्य उतारे यांसह )

चिंतामण नीलकंठ जोशी, एम्. ए. एस्. टी. सी.

मराठीशिक्षक,

एल्फिन्स्टन हायस्कूल, मुंबई.

आवृत्ति पहिली.

---

सन १९१३.

---

किंमत ८ आणे.

# प्रस्तावना.

—:०:—

अनुवाद या विषयावरील स्वतंत्र असें हेंच पहिलें पुस्तक होय. सन. १९१० सालीं. रा. वि. वा. भिडे. बी. ए. यांनीं निंबध आणि अनुवाद अशा दोन्ही विषयांवर एक पुस्तक लिहिलें आहे खरें, पण त्यांच्याच ह्मणण्याप्रमाणें अनुवादासंबधीं त्यांत दिलेली माहिती फारच त्रोटक आहे. ह्मणून ह्या विषयावर हें स्वतंत्र पुस्तक लिहिण्याचा अल्प प्रयत्न केला आहे.

या पुस्तकाच्या जन्माबरोबरच मराठी विषयाची परीक्षा युनिव्हर्सिटीनें घेण्याचें बंद केलें आहे ही एक दुर्दैवाची तर गोष्ट खरीच; तरी पण त्या विषयाचें योग्य ज्ञान विद्यार्थ्यांस आहे असा हेड मास्तरांचा अगर प्रिन्सिपाल साहेबांचा दाखला असल्याशिवाय त्यांस परीक्षेस बसतां यावयाचें नाहीं असा नियमही तिनें केला असल्यामुळें त्या विषयाचें महत्व कमी झालें आहे असें उघडपणें तरी ह्मणतां येत नाहीं. तेव्हां गद्यपद्यात्मक उताऱ्यांचा अनुवाद करण्याचें ज्ञान म्याट्रिक्युलेशन परीक्षेस जाणाऱ्या विद्यार्थ्यांस पूर्ववत् असणें जरूर असल्यामुळें त्या विषयाच्या योग्य अध्ययनास उपयुक्त अशा एकाद्या स्वतंत्र पुस्तकाचीही जरूर आहे असें ह्मणणें वावगें होणार नाहीं. त्याशिवाय स्कूलफायनल परीक्षेस जाणाऱ्या विद्यार्थ्यांना तर अशा पुस्तकाची विशेष जरूर आहे. ट्रेनिंग कालेजच्या विद्यार्थ्यांस व मराठी वाङ्मयाचा परिचय करूं इच्छिणाऱ्या इतर लोकांसही हें उपयुक्त होईल अशी अशा आहे. तरी प्रस्तुत पुस्तकानें ही उणीव कितपत भरून निघाली आहे याचा अंदाज करणें तज्ज्ञ लोकांचें काम आहे.

या पुस्तकांत प्रारंभीं अनुवाद ह्मणजे काय व तो कसा करावा याची पूर्ण माहिती उदाहरणांसह देऊन त्याविषयीं थोडेसे ठोकळ नियमही दिले आहेत. पुढें एकंदर १०० उतारे दिले आहेत त्यांत पद्य ५० व गद्य ५० आहेत. यापैकीं पद्यांतील २५ व गद्यांतील २५ मिळून ५० उताऱ्यांचा अनुवाद करून दाखविला आहे. राहिलेले ५० उतारे, विद्यार्थ्यांनीं स्वतःच्या बुद्धीनें अनुवाद करावा ह्मणून दिले आहेत या उताऱ्यांतील कठीण शब्दांवर विस्तृत टीपाही शेवटीं दिल्या आहेत.

पद्य उतारे निरनिराळ्या नव्या जुन्या २३ कवींच्या ग्रंथांतून दिले आहेत. आपल्या कवींनीं मातृभाषेचा अभिमान दाखवून तिची सेवा कशी केली याची ओळख विद्यार्थ्यांस होऊन त्यांचाही स्वभाषाभिमान जागृत व्हावा व त्यांस मराठी वाङ्मयाची अधिकाधिक गोडी लागावी या हेतूनें एकनाथ, वामन, रामदास, मोरोपंत, मोगरे, यांचे मराठी भाषेविषयींचे उद्गार ज्यांत आले आहेत असे उतारे मुद्दाम प्रारंभींच घातले आहेत. तरी तो हेतु अंशतः जरी सिद्धीस गेला तरी आह्मांस मोठी धन्यता वाटेल. इतर उताऱ्यांची निवड करितांना विषयवैचित्र्य साधून ते विद्यार्थ्यांस मनोरंजक व बोधप्रद होतील अशी योजना केली आहे.

एकंदर गद्य उताऱ्यांत निरनिराळ्या २२ ग्रंथकारांच्या लेखांचे उतारे आले आहेत. उताऱ्यांच्या निवडींत बखरींसारख्या व ऐतिहासिक लेखसंग्रहासारख्या जुन्या मराठी ग्रंथांपासून तों ' आमच्या आयुष्यांतील कांहीं आठवणी ' सारख्या अगदीं अर्वाचीन ग्रंथांपर्यंत मराठी गद्याचे निरनिराळे मासले आले आहेत. पद्याप्रमाणेंच यांतही मनोरंजन व ज्ञानार्जन विद्यार्थ्यांस लाभेल अशी आशा आहे. एकंदर सर्व उताऱ्यांच्या सिंहावलोकनानें विद्यार्थ्यांस मराठी वाङ्मयाची अभिवृद्धि कसकशी होत गेली आहे व तिचें ऐश्वर्य किती थोर आहे याचीही कल्पना होण्यासारखी आहे.

एकंदरींत हा अल्प प्रयत्न लोकादरास पात्र होऊन सदरहू पुस्तकास द्वितीयावृत्तीचा सुयोग आल्यास त्यांत आणखी उताऱ्यांची भर घालून नवीन पुस्तक सर्व मराठी वाङ्मयाच्या अभिवृद्धीचें द्योतक होईल असें करण्याचा आमचा संकल्प आहे.

आमचे मित्र रा. केशव लक्ष्मण ओगले, बी. ए. यांनीं वेळोवेळीं ज्या उपयुक्त सूचना केल्या त्याबद्दल त्यांचे व ' मुंबईवैभव ' छापखान्याच्या व्यवस्थापकांनीं हें पुस्तक काळजीपूर्वक योग्य अवधींत छापून दिल्याबद्दल त्यांचेही आह्मी आभारी आहों.

पुस्तककर्ता.

# भाग १ ला.

## अनुवादविचार.

ज्याला इंग्रेजींत Paraphrase असें ह्मणतात त्यास मराठींत अनुवाद असें ह्मणण्याचा हल्लीं परिपाठ पडला आहे. 'पाराफ्रेज' या शब्दाची व्याख्या 'मूळ उताऱ्यांतील अर्थ निराळ्या शब्दांनीं व निराळ्या वाक्यरचनेनें व्यक्त करण्याची कला' अशी केलेली आढळते. धात्वर्थाकडे नजर दिली असतांही त्या शब्दापासून असा अर्थ निष्पन्न होतो. आतां आपण त्याजबद्दल योजलेल्या 'अनुवाद' शब्दाचा विचार करूं. हा शब्द 'अनु' हा उपसर्ग आणि वद् धातूपासून झालेलें 'वाद' हें नाम मिळून झालेला आहे. तेव्हां दुसऱ्याच्या बोलण्याची पुनरावृत्ति करणें, असा बोध या शब्दावरून होतो; परंतु निराळ्या शब्दांत व निराळ्या वाक्य रचनेंत तो अर्थ सांगितला पाहिजे असाच बोध त्यावरून होत नाहीं. तरी पण ज्या अर्थीं तो तशा अर्थानेंच आतां रूढ होऊं पहात आहे त्या अर्थी तो काढून टाकून त्याच्या जागीं नवीन योजण्याचें विशेष कारण दिसत नाहीं.

श्लेष, अनुप्रास, यमक इत्यादिकांचे चमत्कार व इतर विविध अलंकार, वृत्तवैचित्र्य, विशिष्ट रचना, भिन्न रीति विविध रस वगैरे चित्ताकर्षक गोष्टींनीं ग्रंथकारानें आपली भाषा नटविलेली असते. परंतु अनुवाद करितांना विद्यार्थ्यास स्वतःच्या साध्या व सरळ अशा

भाषेंत ग्रंथकाराचा आशय द्यावयाचा असतो. तेव्हां असें अर्थकथन करितां येण्यास विद्यार्थ्यास अगोदर ग्रंथकाराचें खरें हृद्गत कळणें अगदीं जरूर आहे. नुसते शब्दास शब्द ठेऊन दिल्यानें मूळ अर्थ एकीकडेच राहून कांहींतरी हास्यकारक व निरर्थक प्रकार उत्पन्न होईल.

**कल्पतरूतळवटीं इच्छिली ते गोष्टी। अद्यापि नरोटी राहिली कां।**

या ओळींत शब्दास शब्द घालून अनुवाद केल्यास—

**देवद्रुमाखालीं पाहिजे ती वस्तु। अजून करवंटी उरली कां।**

—असा होईल; व त्यापासून कांहीं अर्थबोध होणार नाहीं. परंतु अनुवादांत असें करणें इष्ट नसून मूळ अर्थ सोप्या शब्दांत सांगावयाचा असतो.

**( १ ) अनुवाद करण्याची रीतिः—कविता.**

( अ ) दिलेल्या कवितेचा प्रथमतः अन्वय करावा. असें केल्यानें वृत्तसुखार्थ कवीनें केलेली वेडीवांकडी वाक्यरचना सरळ होऊन अर्थबोध झटकन होतो. उदाहरणार्थः—

**दुर्जनमन मानितसे दुष्कृति करण्यांत मात्र नित मोद॥**
**अनयरती निस्त्रपता त्याची वाढे न ऐकतो बोध॥**

दुर्जनमन दुष्कृति करण्यांत मात्र नित मोद मानितसे. त्याची अनयरती ( व ) निस्त्रपता वाढे, ( तो ) बोध न ऐकतो असा वरील आर्येचा अन्वय केल्यानें बरेंच काठिण्य कमी होईल.

( आ ) असा अन्वय केल्यानंतर तोच अन्वय मनांत अर्थ पूर्णपणें उतरे तों विद्यार्थ्यानें वारंवार वाचावा. नंतर कठीण शब्द

कोणचे आहेत तें पाहून त्यांवर खालीं लिहिल्याप्रमाणें लहान लहान टिपा लिहाव्याः—

| | | |
|---|---|---|
| दुर्जनमन | = | वाईट लोकांचें मन ( दुराचारी मनुष्य ). |
| दुष्कृति | = | वाईट कृत्य. |
| नित | = | नित्य, नेहमीं. |
| मोद | = | आनंद. |
| अनयरती | = | अन्यायाची आवड. |
| निस्त्रपता | = | निर्लज्जपणा. |
| बोध | = | उपदेश. |

इतकें केल्यानंतर दिलेल्या आर्येचाः—

" दुराचारी मनुष्य नेहमीं वाईट कृत्य करण्यांतच आनंद मानीत असतो. तो सदुपदेशाकडे लक्ष देत नाहीं. ( उलट त्यानें ) त्याचा अन्यायीपणा व निर्लज्जता हीं वाढतच जातात. " असा अर्थ त्यास भिन्न शब्दांत व भिन्न रीतीनें सहज करितां येईल.

ह्या वर दिलेल्या पद्धतीचा अवलंब प्रारंभींच करणें अवश्य आहे. विद्यार्थ्यांस उत्तरोत्तर संवय झाल्यावर अन्वय केल्याशिवायही अर्थ सांगण्याचें सामर्थ्य येईल. परंतु असें सामर्थ्य केवळ सतत अभ्यासानेंच प्राप्त होणारें असून निवळ शब्दास शब्द घातल्यानें येणार नाहीं हें मात्र त्यांनीं पक्कें ध्यानांत ठेविलें पाहिजे.

## ( २ ) अलंकारांविषयींः—

अनुवाद करितांना मूळांतील अलंकाराबद्दल दुसरा अलंकार घालावा, अथवा त्या अलंकाराचा अर्थ साध्या भाषेंत आणावाः परंतु

अलंकारांनीं अर्थव्यक्ति विशेष स्पष्ट होत असल्यामुळें पहिलाच मार्ग प्रशस्त होय; तरी पण पहिल्या अलंकाराऐवजीं दुसरा अयोग्य अलंकार घालण्यापेक्षां तो मुळींच न घालतां नुसता साधा अर्थ सांगणें बरें.

**गरुड जसा गगनांतुनि वेगें उतरोनि पन्नगा झडपी.**

याच्याबद्दल सिंह जसा हत्तीवर उडी मारितो—असा बदल केला तरी शोभेल; परंतु तसें न साधल्यास नुसतें 'तो अत्यंत त्वेषानें चालून गेला.' असें ह्मटलें तरी चालेल.

उपमा, रूपक, उत्प्रेक्षा, व अपह्नुति हे अलंकार एकमेकांबद्दल योजिले असतां अर्थात विशेष बदल न होतां अलंकारांत बदल केल्यासारखें होईल जसें:—

( १ ) हें मुख कमलासारिखें आहे.................... उपमा.
( २ ) हें मुख जणूं काय कमल आहे .......... उत्प्रेक्षा.
( ३ ) हें मुख कमल आहे ........................ रूपक.
( ४ ) हें मुख नव्हे कमल आहे...................अपन्हुति.

मुखाचें चारुत्व वर्णन करण्याचा जो मुख्य हेतु तो यापैकीं कोठ-ल्याही वाक्यानें सिद्ध होईल.

**लुप्तोपमाः**—उपमेय, उपमान, सामान्य धर्म व वाचक या चार अंगांपैकीं कधीं कधीं एक, दोन, तीन अंगें लुप्त असतात, तेव्हां लुप्तोपमा होते. अशा वेळीं अनुवादांत लुप्त असलेलें अंग घालून पूर्णोपमा करावी. जसें:—

**श्री बुडवली महेंद्रश्रीतुल्या मज नसे तिची परवा.**

मोरोपंत सभा.

या ठिकाणीं अखंडपणा व अपरिमितपणा हे सामान्य धर्म लुप्त आहेत तेव्हां ते घालून अनुवाद असा करावाः—'इंद्राच्या ऐश्वर्यासारखें अखंड व अपरिमित असें आमचें राज्यवैभव त्यांनीं गिळंकृत केलें त्याबद्दल मला कांहींच खेद वाटत नाहीं.' दुसरें उदाहरण.

**न सोडी चित्तातें क्षणभरिहि ती कुंदरदना**

पद्यरत्नावली.

कुंदरदना या सामासिक पदांत कुंद हें उपमान व रदन हें उपमेय आहे. उपमावाचक पद 'सें' वगैरे, आणि सामान्यधर्म शुभ्रपणा अणकुचीदारपणा इ. हे लुप्त आहेत. ते घालून अनुवादांत पूर्णोपमा करावी.

**अनन्वयः**—यांत ज्याची त्यालाच उपमा दिली असते. जसें—'या शाळेंत बाळ्यासारखा कोडगा बाळ्याच' याचा अनुवाद—'या शाळेंत बाळ्या अत्यंत कोडगा आहे' 'बाळ्यासारखा दुसरा कोडगा नाहीं' 'बाळ्याच्या कोडगेपणास उपमा नाहीं' 'बाळ्याचा कोडगेपणा अनिर्वाच्य, किंवा अवर्णनीय आहे' अशा कोणत्याही रीतीनें करावा. आणखी उदाहरणें:—

( १ ) कर्णासमान जनिं कर्ण वदान्य थोर  
पार्था परी रणधुरंधर पार्थ वीर.

ल. ग. शास्त्री लेले.

( २ ) समर्था या लोकीं तुजसम अये ! तूंचि जननी

वामन. गंगालहरी,

( ३ ) पाटीरा ! तुजसम तूंचि बा वदान्य.

पद्यमंजरी.

( ४ ) झाले बहु, होतिल बहु, आहेतहि बहु परंतु या सम हा.

मो. पं. विरा. प.

कांहीं अलंकार, शब्दांची मांडणी विशेष रीतीनें केली असतां साधतात. त्या मांडणींत उलटापालट केल्यास त्यांचें अलंकारत्व जातें. यांपैकीं **यथासंख्य** एक अलंकार होय. अशा अलंकाराचा अनुवाद करितांना शब्दरचना फिरविल्यास अर्थ अधिक स्पष्ट होतो. जसें:—

**तृणें मृगाला सलिलें झषाला । संतोष हे वृत्ति महाजनाला ॥**
**तयांस निष्कारण तीन वैरी । किरात कैवर्तक दुष्ट भारी ॥**

वामन—स्फु. श्लो.

‘ मृग गवतावर उपजीविका करितात; मत्स्य पाण्यावर करितात आणि साधु संतोषावर करितात. परंतु मृगाशीं व्याधाचा, मत्स्याशीं कोळ्याचा व साधूंशीं दुष्टांचा साहजिक वैरभाव असतो. ’ असा अनुवाद करावा. किंवा खालच्या ओळीचा ‘ या तिघांशीं अनुक्रमें व्याध कोळी व दुष्ट यांचें स्वाभाविक वैर असतें, ’ असा अर्थ केला तरीही चालेल.

**श्लेषः**—वाक्यांत एका शब्दाचे अनेक अर्थ असले ह्मणजे तेथें हा अलंकार होतो. श्लिष्ट पदांच्या ठिकाणीं पर्यायशब्द योजिले असतां श्लेषहानि होते तेथें शब्दश्लेष हा अलंकार जाणावा. जसें:—

**शुकभाषणानुकार प्रेमें करितो मयूर हें चित्र ॥**
**श्रवण करितील सज्जनरसिक मनीं धरुनि जिष्णुचें मित्र ॥**

मोरोपंत. भीष्मपर्व.

वरील गीतींत 'शुक' व 'मयूर' हे शब्द श्लिष्ट आहेत; त्यांचे पोपट व शुकमुनी आणि मोर व मोरोपंत, असे दोन दोन अर्थ असून दोन्ही-ही विवक्षित आहेत. त्यांबद्दल त्यांचे वाचक शब्द योजिले असतां श्लेष कायम रहात नाहीं. तेव्हां अशा ठिकाणीं अनुवाद करितांना तेच शब्द कायम ठेवून कंसांत दोन्ही अर्थ द्यावे. जसें:–मयूर ( मोर, पक्षीं मोरोपंत ) शुकासारिखें ( पोपटाप्रमाणें, पक्षीं शुकमुनींप्रमाणें ) भाषण करितो, हें मोठें आश्चर्य आहे. इ. दुसरें उदाहरण:—

**गाळांत तळीं लोळति रत्नें, धरिशी तृणें शिरीं नित्य ॥**
**तुज तारतम्य कुठलें ? जडधी हें नांव रे, तुझें सत्य ॥**

पद्यरत्नावली.

यांत 'जडधी' शब्द श्लिष्ट आहे. जडधी ह्मणजे मूर्ख, पक्षीं समुद्र. जडधी येथें 'ड' व 'ल' यांच्या सावर्ण्यानें श्लेष झाला आहे. यालाच अभंगश्लेष ह्मणतात. ह्मणजे या ठिकाणीं श्लिष्ट शब्दाचा पदच्छेद करावा लागत नाहीं. जेथें प्रत्येक अर्थाच्या वेळीं वेगळ्या रीतीनें श्लिष्टपदाचे अवयव घ्यावे लागतात किंवा त्यांचीं पदें पाडावीं लागतात, तेथें सभंगश्लेष होतो. जसें:—

**ती शीतलोपचारीं जागी झाली हळूचि मग बोले ॥**
**औषध 'नलगे' मजला परिसुनि जननी बरें ह्मणुनि डोले ॥**

तिला ( दमयंतीला ) थंडोपचार केल्यावर ती शुद्धीवर येऊन हळूच ह्मणाली ' मला औषध नको ' ( गे मला औषध नल. नळ-राजाच्या भेटीशिवाय इतर औषधांनीं माझा रोग बरा होणार नाहीं.) तें ऐकून तिच्या आईस समाधान वाटलें, व ती बरें असें ह्मणाली. या आर्येंत ' नलगे ' हें पद श्लिष्ट आहे. व ' नल गे ' असा पदच्छेद केल्यानें दुसरा अर्थ निघतो. आणखी समग्र श्लिष्ट कवितेचें उदाहरण भाग २ नं. १२ यांत आलें आहे, तें पहावें.

**व्याजस्तुतिः—**

वरून स्तुति परंतु आंतून निंदा; किंवा वरून निंदा परंतु आंतून स्तुति, अशा प्रकारचें वर्णन असतां हा अलंकार होतो. अशा ठिकाणीं निंदा अथवा स्तुति यांपैकीं जो अर्थ इष्ट असेल त्या अर्थास धरून अनुवाद करावा. जसें:—

**वधुनि माझी हे कनकरूप काया,**
**कटकमुकुटादिक भूषणें कराया;**
**कशी आशा उपजली तुला राया ?**
**थोर औदार्य फार दया माया !** रघुनाथ पंडित.

ही हंसाची नलराजाप्रत उक्ति आहे. या दिंडींत शेवटल्या चरणांत वरून स्तुति परंतु आंतून निंदा आहे. ' तूं फार अनुदार असून निष्ठुर आहेस ' असा त्या चरणाचा अनुवाद करावा. दुसरीं उदाहरणें:—

**(१) वरुनि न जाणें ह्मणशी पूरुकुलीं तूंच सुज्ञ साधु भला ॥**
मोरोपंत.

( २ ) बाळ्या ! आज एवढ्या पहाटेस उठून धडा पाठ करण्यास बसलास ही अवदशा कोठून आठवली !

( ३ ) आपण फार शहाणे आहां !

( ४ ) ऐन प्रसंगीं रामभाऊंनीं तुह्माला पैशाची मदत केली, मूर्खच ते.

**वक्रोक्ति** या अलंकारांत, बाह्य शब्दार्थाहून विवक्षित अर्थ भिन्न असतो, त्या ठिकाणीं अनुवाद विवक्षित अर्थांत करावा. जसें:—

**या दृढ मदभिप्रायापासुनि वारूं शके न शक्र मला ॥**
**मर्त्यांची काय कथा ! प्राकृतसा कर्ण काय हा गमला ॥**

मोरोपंत—कर्ण.

'प्राकृतसा कर्ण काय हा गमला' या वक्रोक्तीचा अनुवाद 'कर्ण हा सामान्य नव्हे' असा करावा.

**विषमालंकार**—यांत अननुरूप वस्तूंचा संबंध वर्णिला असतो, ह्मणून अनुवादांतल्या दोन वस्तूंत महदंतर आहे, असा अर्थ सूचित करावा. जसें:—

**रवीचा महान् कीर्तिमान् वंश कोठें ॥**
**तशी ही मदीया जडा बुद्धि कोठें ॥**

रघुवंश.

सूर्यवंशाची कीर्ति फार अगाध आहे व माझी बुद्धि अगदीं मंद आहे. ( तेव्हां त्याचें यथार्थ वर्णन मजकडून होणें अशक्य आहे. )

**पर्यायोक्तिः**—उजू व सरळ वर्णन न करितां पर्यायानें वर्णन करणें हें या अलंकाराचें लक्षण. तेव्हां अनुवादास दिलेल्या कवितेंत, अगर वाक्यांत, हा अलंकार असल्यास त्याचा विद्यार्थ्यानें जर शब्दशः

अर्थ केला तर त्याला वक्त्याचें खरें मर्म कळलें आहे किंवा नाहीं हें स्पष्ट होत नाहीं. तेव्हां अशा पर्यायोक्तीच्या ठिकाणीं ऋजू व सरळ अर्थ सांगावा. कारण अशा योगानें भिन्न शब्दरचनेंत व वाक्यरचनेंत मूळ अर्थ उत्तम तऱ्हेनें आणिला जातो. जसें:--

**केलेंचि धन्य दर्शनदानें येऊनि कानना मातें ।।**
**आजि देवेश, निवावे बहु हे सेवूनि कान नामातें ।।**

९९,१३ वन. मोरोपंत.

ही सावित्रीची यमाप्रत उक्ति आहे. अरण्यांत येऊन मला दर्शन दिल्यानें मी मोठी कृतकृत्य झाल्यें. हे देवश्रेष्ठा ! आपल्या नामश्रवणानें ( आतां माझे ) कान अत्यंत तृप्त व्हावे. हा शब्दशः अर्थ झाला परंतु याच्यापेक्षां खालच्या ओळीचा 'हे देवश्रेष्ठा आपलें नांव काय ? तें ऐकण्यास मी फार उत्सुक आहें' असा सरळ अनुवाद जास्त चांगला दिसेल. आणखी उदाहरणें:—

**जन्मुनि कवण्या राजर्षींचा वंश अलंकृत केला ।**
**आत्मवियोगें देश कोणता पावविला दुःखाला ।।**

शाकुन्तल.

ही अनुसूयेची दुष्यन्ताप्रत उक्ति आहे. यांत आपलें नांव गांव काय असें प्रत्यक्ष न विचारितां तें पर्यायानें तिनें विचारलें आहे. तेव्हां या ठिकाणींही वरच्याप्रमाणें सरळ अर्थ करावा.

**ती सुमति ह्मणे ताता, न त्यजुनि पयोधिला नदी परते ।।**
**न पतंगचित्तवृत्ति क्षणही रत्नीं त्यजूनि दीप रते ।।**

२३, १३, वनप. मोरोपंत.

'सत्यवानास वरूं नकोस, दुसऱ्या कोणास वर' असें बाप ह्मणूं लागला तेव्हां सावित्रीनें केलेला जबाब ह्या आर्येत दिला आहे. त्यांत 'नदी समुद्रालाच मिळते, पतंग रत्न टाकून दिव्यावरच झेंप घालतो' तेव्हां मी ही सत्यवानास सोडणार नाहीं असें पर्यायानें तिनें सांगितलें आहे.

गद्यामध्येंही पर्यायोक्ति क्वचित् आढळते, तेथेंही सरळ अर्थ करावा. जसें 'त्रिभुवनास प्रकाश देणारा उगवला' 'ज्यानें स्मरतनु विलयास नेली तो आमचें कल्याण करो.' अशा वाक्यांचा अनुवाद— 'सूर्य उगवला;' व 'शंकर आमचें कल्याण करो' असा करावा.

**समासोक्तिः**—पर्यायोक्तींत जसा विस्तार असतो तसा या अलंकारांत संक्षेप असतो. तेव्हां अनुवादाचे वेळीं या संक्षेपाचा विस्तार करावा, ह्मणजे अर्थ स्पष्ट होतो जसें:—

**पीयूषमधुर पय तव सेवुनि मोदें पुनः पुनः गंगे ॥**
**विगतश्रम उत्संगीं निद्रित होईन मी कधीं सांगे ॥**

लेले शास्त्री.

यांत 'पुनः पुनः पयसेवन, उत्संगीं विगतश्रम होऊन निद्रित होणें' या विशेषणपदांच्या सामर्थ्यानें तान्हें मूल आणि आई यांचा अप्रस्तुत वृत्तांत थोडक्यांत वर्णिला आहे. त्याचा विस्तार असा करावा:—

ज्याप्रमाणें एकादें तान्हें मूल आपल्या आईचें अमृततुल्य दूध आनंदानें वारंवार पिऊन क्लेशरहित होतें, व त्याला तिच्याच मांडीवर झोंप लागते, त्याप्रमाणें हे गंगे! तुझें अमृततुल्य पाणी आनंदानें

वारंवार पिऊन दुःखरहित होत्साता मी तुझ्या तीरीं कधीं सुख पावेन?
आणखी उदाहरणें:—

( १ ) रमले मुहूर्तपरिमित निद्रेसीं सर्व जीव विश्रमले
७०. २०. द्रोण. मोरोपंत.

( २ ) मग भगवान् विधु उगवे पळवी देवूनि कांप तिमिरासी.

( ३ ) बहु दुःख दे त्यजुनि मज आपण वरिली तुझ्या चिंता तातें;
८१. १०. वन. मोरोपंत.

( ४ ) कलि दमयंतीप्रेमा हे दोघे वेढिती नळाला हो;
प्रेम्याला त्याचें मन सांपडलें, देह त्या खळाला हो.
१२१. ४. वन. मोरोपंत.

यांतही वरल्याप्रमाणें योग्य विस्तार करावा.

( ३ ) कवितेचा उतारा असल्यास कवितेंतच येणारीं शब्दांचीं रूपें व जुने शब्द यांच्या ऐवजीं गद्यास साजणारीं तत्समान रूपें व तदर्थक शब्द योजावे. जसें:—

( १ ) **करूं ये समाधान जो मूर्ख त्याचें। धरूं ये सुखें चित्त पैं जाणत्याचें॥ न जाणे न नेणे अशा पामराला। बुझावूं शकेना विधाता तयाला॥** वामन.

करूं ये=करितां येतें; पैं=पादपूरक अव्यय; धरूं ये=धरतां येतें; न जाणे=अज्ञानी आहे; बुझावूं शकेना=समजूत करतां येत नाहीं. तयाला=त्याला. येणें प्रमाणें फेरफार केला पाहिजे.

( २ ) कित्येक ठिकाणीं वृत्तसुखार्थ लघुगुरूंची ओढाताण निरर्थक

यमकरचना, इत्यादि अडचणीमुळें कवितार्थात क्लिष्टत्व येतें; कांहीं ठिकाणीं तर तो अगदींच संकुचित झालेला असतो अशा ठिकाणीं विद्यार्थ्यानें कवीच्या उद्दिष्ट अर्थाकडे पूर्ण लक्ष देऊन अनुवाद केला पाहिजे; जसें:—

**श्रवण हरिकथेचें, कीर्तनीं गात जावें,**
**स्मरण, चरणसेवा, अर्चनींहि भजावें;**
**नमन करुनि दास्यें सख्य आत्मार्पणातें,**
**करिति तरति वाटे, सार हें आपणातें.**

**वामनपंडित—नृसिंह.**

यांत नवविधा भक्तीचें वर्णन करण्याचा कवीचा हेतु आहे. परंतु हें आपणांस माहित नसतां जर ही कविता आपण वाचली तर अर्थबोध होणार नाहीं. अन्वय लावूं गेलों तर ' कीर्तनीं हरिकथेचें श्रवण गात जावें, आर्चनींहि चरणसेवा स्मरण भजावें, दास्यें नमन करूनि आत्मार्पणातें, ( जे ) सख्य करिति ( ते ) तरति, हें आपणातें सार वाटे ' असा हास्यकारक प्रकार होईल. यांत व्याकरणास ठिकाण नाहीं, कर्त्याचा पत्ता नाहीं, अशी स्थिति झाली आहे. याचें कारण कवीच्या मनांत ' श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनं ॥ अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम् ॥ हा संस्कृत श्लोक असावा. ' श्रवणं ' वगैरे मूळांतील शब्द वृत्ताच्या विटाळच्यात व यमकाच्या शृंखलांत बसतना, तेव्हां त्यांची ओढाताण करून कसेबसे त्यानें कोंबून दिले आहेत. त्यामुळें व्याकरणाकडे दुर्लक्ष, अर्थाची हानि व क्लिष्टता हे दोष त्याच्या पदरीं आले आहेत. अशा क्लिष्ट कवितांचा अनुवाद करितांना प्रत्येक पदाकडे, अन्वयाकडे,

व व्याकरणाकडे लक्ष न देतां समग्र कविता वारंवार वाचून कवीचा मुख्य रोंख काय आहे तो पहावा व गोळाबेरीज अर्थ द्यावा, त्याशिवाय दुसरा मार्ग नाहीं. यमकार्थ व वृत्तसुखार्थ केलेल्या ओढाताणीचीं उदाहरणें.

( १ ) वदोनीयां ऐसें मग रणिं कुशालागिं **हटकी,**
म्हणे बाळा ! आतां शरण मज ये सांडिं **हट कीं** ॥

( २ ) मारितां **गपा** परंतु सर्व ठावुकें मला ॥

( ३ ) **दैवें** रुद्र येत द्रोणपर्वतासि घेउनी ॥

( ४ ) घे स्वर्ग **संपाति** करीं गुण सागरा ! या ॥

( ५ ) वर्णरीति यमकीं समजा ते तेचि कीं विषम कीं सम जाते ।
शब्द वामनशुभानुभवाचे त्रास ते हरिति भानुभवाचे ॥

वामन—वनसुधा.

पांचव्याचा तात्पयार्थः—यमकांत वर्णरचना कधीं सम कधीं विषम जाते; यमक साधण्यासाठीं केलेल्या शब्दरचनेचा अर्थ कधीं वेडावांकडा होतो, कधीं सरळ असतो; तथापि ते शब्द आपल्या (पंडिताच्या) शुभ अनुभवाचे असल्यामुळें ते भानुभवाचे (सूर्यरूप संसाराचे) त्रास हरण करितात. ज्या श्लोकांत ह्या ओढाताणीचा व अर्थहानीचा हा कबूल जबाब दिला आहे तो श्लोकही किती क्लिष्ट आहे, व त्यांत किती ओढाताण झाली आहे, हें ह्यावरून लक्षांत येईल.

( ४ ) अनुवाद करितांना शक्य त्या ठिकाणीं रूप, भेद, अर्थ व प्रयोग यांत बदल करावा. जसें:—

( १ ) रूपः—तो विद्वान् आहे=तो विद्वान नाहीं असें नाहीं. या ठिकाणीं करणरूपाच्या बद्दल अकरणरूप योजिलें आहे, तरी दोन निषेध असल्यामुळें मूळ अर्थ कायम आहे. तो जेवला नाहीं=तो उपाशीं आहे. तो निजला नाहीं=तो जागा आहे. या वाक्यांत अकरणरूपाबद्दल करण घालून अर्थ तोच ठेविला आहे. दुसरीं उदाहरणें.—

**ही कायनौ तुझ्या करिं मनुजा बहु पुण्य खर्चुनी पडली ॥**
**संसाराब्धि तरुनि जा जोंवरि तव नाव ही नसे फुटली ॥**

'हे मनुष्या ! ही शरीररूपी नौका तुला थोड्या थोडक्या पुण्यानें नाहीं लाभली ? ( ह्मणून ) जोंपर्यंत ती धड आहे तोंपर्यंत संसार-सागरापलीकडे जाण्यास तूं चुकूं नकोस.' या अनुवादांत मूळ अर्थ कायम ठेवून करणरूपाऐवजीं अकरण व अकरणाऐवजीं करण सर्वत्र घातलें आहे.

( २ ) भेद—मूळरूप भेद, शक्य व प्रयोजक या भेदांची आलटापालट शक्य तितकी करावी. जसें:—

**तुझें यशचि तारितें परि न केवळा तारवे ॥** मोरो.

तुझी किर्ति गाऊन भक्त संसारांतून तरून जातात. परंतु नुसत्या कीर्तनाच्याच जोरावर त्यांस तरतां येत नाहीं. या अनुवादांत प्रयोजकभेदाऐवजीं मूळरूप भेद घातला आहे.

**सहाय आसिला असे तरिच शत्रुला मारवे ॥** मोरोपंत.

तरवारीला धारणकरणाराचें सहाय्य असेल तरच तिच्यांत शत्रूस

ठार मारण्याचें सामर्थ्य येतें. या ठिकाणीं शक्य भेदाऐवजीं मूळरूप भेद घातला आहे.

( ३ ) अर्थः—स्वार्थ, आज्ञार्थ, संकेतार्थ आणि संशयार्थ हे अनुवादांत शक्य असेल त्या ठिकाणीं एकमेकांबद्दल घालावे. जसें—

**जा, सर्व सिद्ध व्हा, जरि आहे उद्युक्त मानस मराया ॥**

मो. उद्योग.

'मरावयाला हौसले असाल तर जाऊन तुम्हीं सर्वांनीं लढाईची तयारी करावी, असें कृष्णानें त्यांस सांगितलें.' यांत आज्ञार्थाच्या ठिकाणीं विध्यर्थ घातला आहे. 'तो उद्यां आला तर येईल.' या संकेतार्थक वाक्याचा अनुवाद 'उद्यां त्याचें येणें कायम नाहीं' असा स्वार्थी करावा. 'आम्ही आजि झगडतों जरि येता तो विराट तरि त्यासी' लढण्यास आलेल्या प्रत्यक्ष विराटाशीं सुद्धां मी आज लढलों असतों. हें आणखी एक उदाहरण होय.

( ४ ) प्रयोगांतही साधेल त्या ठिकाणीं फेरबदल करावा. जसें:—

**'जरि लाजविति सख्या अनुसरली गौरी हरा न त्या हरिला॥**

मोरोपंत.

'मैत्रिणींनीं जरी तिला लाजविलें तरी पार्वतीनें शंकारासच वरिलें' या ठिकाणीं कर्तरीबद्दल कर्मणी घातला आहे.

'सिद्धाश्रमांत नव्हता तात, तुला म्यांचि पूजिलें वन्यें' (—मोरो.) 'तुला म्यांचि पूजिलें' या भावे प्रयोगाबद्दल 'मीच तुझी पूजा केली' असा कर्तरी प्रयोग घालावा.

'वाट चालतां चालतां त्यास एका अरण्यांत सांजावलें' या भावकर्तरी प्रयोगाबद्दल 'प्रवास करीत करीत तो एका अरण्याजवळ आला तों संध्याकाळ झाली' असा कर्तरी प्रयोग घालावा.

( ५ ) **गद्य:**—पद्यानुवादाविषयीं जे सामान्य नियम सांगितले तेच गद्यानुवादासही लागू पडतात. परंतु गद्यांत अर्थाकडे विशेष धोरण असावें लागतें. गद्यांत अन्वय करण्याची जरूर नाहीं हें सांगितलें पाहिजे असें नाहीं. गद्यानुवादांतही शब्दास शब्द न घालण्याची खबरदारी विद्यार्थ्यानें घेतली पाहिजे.

गद्य उताऱ्याचा अनुवाद करितांना प्रथमतः विद्यार्थ्यानें तो उतारा समग्र वाचून पाहून त्याचा एकंदर मथितार्थ काय आहे तो मनांत आणावा. नंतर क्रमशः प्रत्येक वाक्य घेऊन त्याचा अर्थ पहावा; व तो अर्थ लावतांना एकंदर उताऱ्याकडे लक्ष असावें. अशा रीतीनें सर्व उताऱ्याचें नीट मनन करून त्याचा अर्थ मनांत पूर्णपणें बिंबल्यावर प्रत्येक वाक्याचा अनुवाद लिहिण्यास त्यानें सुरवात करावी. तसें करतांना मूळांतील सर्व शब्द विसरून गेल्यासारखें करून त्यांतील अर्थ मात्र तंतोतंत अगदीं भिन्न शब्दांनीं व भिन्न वाक्यरचनेनें करण्यास लागावें. परंतु प्रत्येक शब्दाबद्दल भिन्न शब्द योजलाच पाहिजे असा जो कित्येक विद्यार्थ्यांचा समज झालेला असतो तो मात्र अगदीं चुकीचा आहे. कित्येक वेळां ग्रंथकाराचा शब्द फारच योग्य व अत्यंत प्रसिद्ध असतो, तेव्हां अशा शब्दाऐवजीं केवळ भिन्न शब्दयोजनेसाठींच त्याच्याहून अप्रसिद्ध शब्द योजणें चुकीचें आहे. जसें—दशाननाचे

ाद्दल दिक्कंठ; सुग्रीवाबद्दल सुकंठ; शंकराबद्दल शितिकंठ; इंद्राबद्दल बेडौजा किंवा पाकशासन; सुवर्णाबद्दल हाटक किंवा गांगेय. इ.

## ( ६ ) निरनिराळ्या वाक्यरचनांविषयीं.

कधीं कधीं दिलेला उतारा इतक्या सरळ व सोप्या भाषेंत असतो कीं त्यांत शब्दांचें अथवा वाक्प्रचाराचें काठिण्य फारसें नसतें, अशा वेळीं विद्यार्थ्यानें खालील गोष्टींकडे लक्ष द्यावें.

( अ ) मूळांत लहान लहान पृथक् वाक्यें असल्यास अनुवादांत तीं एकत्र जोडून त्यांचें एक मिश्र अथवा संयुक्त वाक्य करावें.

( आ ) मूळांत जर एकच मोठें वाक्य असेल तर अर्थानुरोधानें त्याचे लहान लहान तुकडे पाडून त्याचीं निरनिराळीं साधीं वाक्यें करावीं. जसें:—

( अ ) यथार्थदीपिकेची भाषा सरळ व जोरदार आहे. समयानुरूप ती रसाळ व हृदयंगम अशी दिसून येते. हा ग्रंथ तयार झाल्याला सुमारें अडीचशें वर्षें झालीं. तरी भाषेंत जुनाटपणा आढळत नाहीं वाक्यरचना अगदीं सरळ गद्यासारखी आहे. यमकाकरितां कवीनें आटापेट केलेला नाहीं. एकंदरींत हा ग्रंथ सुबोध करण्याचा पंडितांचा हेतु होता.

या सहा सात लहान लहान वाक्यांचा अनुवाद खालीं दिल्याप्रमाणें एका वाक्यांत आणावा.

**यथार्थदीपिकाकाराचा उद्देश अर्थ सरळपणें व्यक्त करण्याचा अस-**

त्यामुळें त्याची भाषा साधी पण भारदस्त, प्रसंगनुसार मधुर व चित्ताकर्षक, अडीचशें वर्षांची जुनी पण नव्याप्रमाणें भासणारी, छंदोबद्ध पण रचनेंत गद्यासारखी सरळ, व ओढाताणीशिवाय यमकालंकारांनीं नटविलेली अशी आढळते.

( आ ) इ. स. १७८९ या सालीं फ्रान्स देशांत जो रयतेचा मोठा दंगा झाला,—कीं ज्याच्या योगानें फ्रान्स देशांत दोन तीन वर्षांतच आकाश आणि पाताळ एकच होऊन गेलें, आणि ज्या अपूर्व उत्पाताचा सगळ्या युरोपास धाक पडून त्याप्रमाणें वीस पंचवीस वर्षें सगळ्या देशांतून सारखी धुमश्चक्री चालली होती,—त्याच्याच संबंधानें प्रस्तुत वक्त्याची वक्तृत्वशक्ति पूर्ण उदयास आली.

या मोठ्या वाक्याचे खालीं दिसल्याप्रमाणें अनुवादांत लहान लहान तुकडे पाडावे:—

इ. स. १७८९ मध्यें फ्रेंच प्रजेनें मोठें बंड केलें. तें फार माजलें आणि दोन तीन वर्षांत सर्व फ्रान्सभर हाहाकार उडाला. त्या भयंकर अरिष्टानें सर्व युरोपीयन लोक भेदरून गेले. हा धुमाकूळ सर्व युरोपभर वीस पंचवीस वर्षें सारखा चालू होता. अशावेळीं बर्कसाहेबांच्या वक्तृत्वाचा खरा प्रभाव दिसून आला.

( इ. ) विशेषण अथवा क्रियाविशेषण मूळांत असल्यास अनुवादांत त्याचेवरून विशेषणात्मक वाक्य अथवा क्रियाविशेषणात्मक वाक्य बनवावें. अथवा उलट त्यांच्याजागीं विशेषण अथवा क्रिया-

विशेषण योजावें जसें:-शहाणा मनुष्य विचारी असतो-याचें-जो मनुष्य शहाणा असतो तो कोणतीही गोष्ट विचार करून करितो-असें करावें. अथवा:-

**पोहाभेणें जिकडे जावें। तिकडे पोट येतें सवें।**

याचा पोटाच्या भीतीनें पळूं लागणारा बरोबर पोट सर्वत्र आहेच, असा अनुवाद करावा.

थोडक्यांत सांगावयाचें ह्मणजे दृष्टि अन्य शब्द घालण्याकडे न ठेवतां अन्य वाक्यरचना करण्याकडे ठेवावी.

(७) अनुवाद करितांना आणखी एक विशेष गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे ती ही कीं अनुवाद ह्मणजे सविस्तर विवरण नव्हे. तेव्हां ज्याप्रमाणें टीका लिहितांना एखाद्या गोष्टीची सविस्तर माहिती द्यावी लागते तशी अनुवादांत देण्याचें कारण नाहीं. उ. ' अहल्या शिळा राघवें मुक्त केली.' या ओळीचा अनुवाद करितांना अहल्या ही शिळा कशी झाली ही माहिती सांगत बसण्याचें प्रयोजन नाहीं तर ' शिळारूपझालेल्या अहल्येचा रामानें उद्धार केला ' एवढें सांगितलें ह्मणजे बस्स आहे.

या वरून सहज असें लक्षांत येईल कीं अनुवादाची कला मध्यम पदास उत्तम पदानें गुणून त्यास प्रथम पदानें भागावें. ह्मणजे भागाकार येईल तें उत्तर अशासारखे गणितांतील नियम पाठ करून साध्य होणारी नसून तिचें साध्यासाध्यत्व विद्यार्थ्यांच्या भाषाप्रभुत्वावरच अवलंबून राहील. आणि हें भाषाप्रभुत्व उत्तम कवींची काव्यें व उत्तम लेखकांचे लेख मार्मिकपणानें वारंवार अवलोकन केल्यानेंच येणारें आहे. तरी केवळ मार्गदर्शक ह्मणून कांहीं ठोकळ नियम पुढें दिले आहेत.

# समालोचन.

येथपर्यंतच्या विवेचनांत जे नियम सविस्तर सांगितले, त्यांचा सारांश असाः—

( १ ) मूळातील सर्व गोष्टी अनुवादांत आल्या आहेत कीं नाहीं हें पहावें.

( २ ) मूळांत न सांगितलेली अशी एकही गोष्ट अनुवादांत येऊं देऊं नये.

( ३ ) मूळ आणि अनुवाद यांत शक्य तेवढें शब्दांचें, वाक्यरचनेचें व भाषापद्धतीचें भिन्नत्व असावें.

( ४ ) मूळाचें समग्र मनन करावें.

( ५ ) मूळ कविता असल्यास प्रथमतः तिचा अन्वय करावा.

( ६ ) जुनाट शब्द व कवितेंतच येणारीं शब्दांचीं विशिष्ट रूपें बदलावीं.

( ७ ) मूळ गद्य असल्यास प्रथम समग्र उतारा वाचावा. नंतर त्यांतील मथितार्थाच्या धोरणानें प्रत्येक वाक्याचें पूर्णपणें रूपांतर करावें.

( ८ ) एखाद्या शब्दास प्रतिशब्द नसल्यास अथवा उताऱ्यांतील शब्दाहून प्रतिशब्द अप्रसिद्ध असल्यास अनुवादांत खुशाल मूळ शब्दच ठेवून द्यावा.

( ९ ) एका अलंकाराबद्दल दुसरा समर्पक अलंकार घालता येत नसल्यास त्याचा साध्या शब्दांत अर्थ सांगावा.

( १० ) दिलेल्या सर्व गोष्टींकडे धोरण ठेऊन होताहोईतों अनुवाद थोडक्यांत आणावा.

( ११ ) अनुवादांत विरामांकडे, व्याकरणशुद्धीकडे व भाषाशुद्धीकडे फार लक्ष द्यावें.

( १२ ) शब्दास शब्द ठेवून अनुवाद न करण्याची खबरदारी ठेवावी.

( १३ ) सर्व अनुवाद लिहून झाल्यावर पुनः त्याचें पर्यालोचन करून मूळातला अर्थ कितपत उतरला आहे तें पहावें.

# भाग २ रा.

## अनुवादाचीं उदाहरणें.

१

रामाचें रचिलें चरित्र मुनिनें वाल्मीकिनें संस्कृतीं ।
नाहीं हानि कदापि अन्य कविहीं तें वर्णितां प्राकृतीं ॥
मुक्तांचा रचिलाचि हार वहिला जो रेशिमाच्या गुणें ।
तो कार्पासगुणें करूनि करितां काय प्रभेला उणें ? ॥ १ ॥
' गैर्वाणें राघवाचें यश रसिकजनां लागतें फार मिष्ट ।
तैसें न प्राकृतानें ' अचतुर ह्मणती, मानिती तें न शिष्ट ! ।
पीतां गोक्षीर कार्तस्वर[3]मणिं[4]चषकें देतसे जीवि गोडी ।
सारज्ञाला पलाशद्रुमदलपुटकें सेवितां ते न सोडी ॥ २ ॥
श्री वाल्मीकिप्रभृति मुनिहीं वर्णिली रामलीला ।
मादृक्षां[5]हीं मुदितहृदयें काय गावें न तीला ? ॥
श्रीकंठें[6]द्रायमरपरिषत्सेव्यगंगाप्रवाहीं ।
संध्यास्नानादिक न करणें काय या मानवांहीं ? ॥ ३ ॥

मोरोपंत–मंत्ररामायण.

२

ह्मणतात जे ' मराठी भाषा होणार ही असे नष्ट ।
' मिळणार काय करुनि व्यर्थ हिला वांचवावया कष्ट ? ॥ १ ॥
त्यांना हेंच पुसा कीं '—मरणोन्मुख होय आपुली माय,
' ह्मणुनी औषध कांहीं पुत्रीं देऊं नये तिला काय ? ॥ २ ॥
माता तशी स्वभाषा सेवाया होय आपणा उचित.
किंबहुना मातेहुनि अधिक हिची योग्यता असे खचित ॥ ३ ॥

---

१ तत्काळ. २ संस्कृतानें. ३ सोनें. ४ पेला; वाटी. ५ माझ्या सारख्यांनीं. ६ श्रीकंठ+ईंद्र+आदि+अमर+परिषत+सेव्य+गंगा+प्रवाह.

दे जन्म मात्र माता, भाषा व्यवहार चालवी सकळ ।
मातेशिवाय जन्महि जाय, न भाषेशिवाय एक पळ ॥ ४ ॥
रक्षी ह्मणूं, तरी ती बाल्यापुरतीच काळजी वाहे ॥
आबालवृद्धरक्षण–कार्यीं ही दक्ष सारखी राहे ॥ ५ ॥
उपकार थोर ऐसे नित्य जिचे आपणावरी होती, ।
हो कां दीन, कधीं नच योग्य उपेक्षावया तरी हो ती ॥ ६ ॥
यास्तव ज्या कोणां ह्या निज भाषेचा असेल अभिमान
देवोत सादरें मम विनतिकडे ग्रंथकार ते कान ॥ ७ ॥
ग्रंथप्रसार पुष्कळ जनपद[1]भाषेंत जों नसे झाला,
लागायाचें नाहीं जनमत हें तोंवरी सुमार्गाला ॥ ८ ॥
जे ही स्वमाय सोडुनि परकीचा लोभ इच्छिती लटका ।
सापत्न[2]भावनेचा लागूं या त्यांस चांगला चटका ॥ ९ ॥

मोगऱ्यांचीं फुलें.

३

भाषा पालटे कांहीं । अर्थ वायां जात नाहीं ।
कार्यसिद्धि ते सर्वही । अर्थाचिपासीं ॥ १ ॥
तथापि प्राकृताकारितां । संस्कृताची सार्थकता ।
येऱ्हवीं त्या गुप्तार्था । कोण जाणे ॥ २ ॥
आतां असो हें बोलणें । भाषा त्यागूनि अर्थ घेणें ।
उत्तम घेऊन त्याग करणें । सालीटरफलांचा ॥ ३ ॥
अर्थ सार भाषा पोचट । अभिमानें करावी खटपट ।
नाना अहंतेनें वाट । रुधिली मोक्षाची ॥ ४ ॥
येक म्हणती मऱ्हाटें काये । हें तों भल्यांनीं ऐकों नये ।
तीं मूर्खें नेणती सोये । अर्थान्वयाची ॥ ५ ॥
लोहाची मांदूस[3] केली । नाना रत्नें साठविलीं ।
ते अभाग्यानें त्यागिली । लोखंड म्हणोनि ॥ ६ ॥

---

१ देशीभाषा (मराठी) २ सवतीमत्सर ३ पेटी.

तैसी भाषा प्राकृत । अर्थ वेदान्त आणि सिद्धान्त ।
नेणोनि त्यागी भ्रान्त । मंद बुद्धिस्तव ॥ ७ ॥
परिस देखिला अंगणीं । मार्गीं पडला चिंतामणी ।
आव्हा[1] वेल महा गुणी । कूपामध्यें ॥ ८ ॥
तैसें प्राकृतीं अद्वैत । सुगम आणि सप्रचीत ॥
अध्यात्म लाभे अकस्मात । तरी अवश्य घ्यावें ॥ ९ ॥
न करितां वित्पत्तीचा श्रम । सकळशास्त्रार्थ होय सुगम ।
सत्समागमाचें वर्म । तें हें ऐसें असे ॥ १० ॥

रामदास—दासबोध.

४

जी जी देवाधिदेवा । प्राकृत भाषेकरितां तुझी सेवा ।
वेदवाणीस उपजे हेवा । तुझ्या स्वरूपाचा ठेवा जीमाजी ॥ १ ॥
मुख्य तुझें नाम गोड । मुखीं सर्व भाषांचें कोड, ।
जें कानीं मुखीं येतां, मोड । देहीं उपजती प्रेमाचे ? ॥ २ ॥
काय वेदशास्त्र जाणे व्रज ? । त्याची भक्ति देखोनि, आत्मज ।
ब्रह्मा वेदवक्ता शिरीं पदरज । वंदी व्रजनारीजनाचें ! ॥ ३ ॥
गजेंद्र कोण शास्त्र पढला ?।बाळ कोण्या पांडित्यें ध्रुवपद चढला?
दासी कुब्जा तिला घडला । काय अभ्यास संस्कृताचा ? ॥ ४ ॥
अभिमानें बुडाले पंडित, । यज्ञपत्न्यांनीं अर्चितां वैकुंठमंडित ।
न पढतां, न वाचितां अखंडित । आनंद भक्तीनें पावल्या ॥ ५ ॥
भक्ति थोर; भक्ति थोर; । तूं चंद्रमा, भक्त चकोर; ।
भक्त मयूर, मेघश्याम समोर । त्यांस तूं सर्वत्रही ॥ ६ ॥
एवं पावावया तुझे चरण, । भाषा कोणी नव्हे कारण, ।
कारण सप्रेम अंतःकरण । देवाधिदेवा ! ॥ ७ ॥

वामन—यथार्थदीपिका.

५

संस्कृत ग्रंथकर्ते ते महाकवी । मा प्राकृतीं काय उणीवी ? ।
नवीं जुनीं ह्मणावीं । कैसोनि केविं सुवर्णसुमनें ? ॥ १ ॥

---

१ दक्षिणवर्ति वेल.

कपिलेंचें ह्मणावें क्षीर । मा इतरांचें तें काय नीर! ॥
वर्णस्वादें एकचि मधुर । दिसे साचार सारिखें ॥ २ ॥
संस्कृतवाणी देवें केली । प्राकृत तरी चोरापासोनि जाली?॥
असोतु या अभिमानभुली । वृथा बोलीं काय काज ? ॥ ३ ॥
आतां संस्कृता अथवा प्राकृता । भाषा जाली जे हरिकथा ॥
ते पावनचि तत्वता ॥ सत्य सर्वथा मानली ॥ ४ ॥
देवासि नाहीं वाचाभिमान । संस्कृत प्राकृत त्या समान ॥ ५ ॥
ज्या वाणीं जाहलें ब्रह्मकथन । त्या भाषा श्रीकृष्ण संतोषे ॥ ६ ॥
माझी मराठी भाषा चोखडी । परब्रह्में फळली गाढी ॥
संत सज्जन जाणती गोडी । त्या लागीं जोडी जोडिला ग्रंथ॥७॥

एकनाथी—भागवत.

६

अहो ! हिमनगोद्भवा कुसमिता लतांनो स्मरा !
मुदें विचरतां तुह्मी गवय हो स्मरा ईश्वरा !
स्मरा जलद हो तुह्मी प्रभुवरा मनापासूनी ।
सहाय तुमची सखी कनकगौर सौदामिनी[1] ॥ १ ॥
अगा अचलनायका[2] ! प्रभुस पूजण्या साधनें ॥
समीप असती तुझ्या; भज तया प्रसन्नें मनें ।
पवित्र जल घेउनी सुरधुनी[3]तटापासुनी ।
करींच अभिषेक तूं, अगरु[4]चंदना चर्चुनी ॥ २ ॥
स्वयें हरिणनाभिनें प्रभुस कृष्ण लावीं टिळा ।
सुगन्धि सुममालिका ग्रथुनि घालिं त्याच्या गळां ।
प्रसन्न विभुसी करीं, अगरुधूप तूं लावुनी ।
करील मग आरती जलदभार्ज[5] सौदामिनी ॥ ३ ॥

महाजनि—कुसुमांजलि.

हिमालयावरून केलेलें ईश्वराचें प्रातःस्तवन.

१ वीज. २ पर्वतश्रेष्ठ. ३ गंगा. ४ कृष्णचंदन. ५ भार्या.

७

ग्रीष्मीं वारी सरुनि तव हें शुष्क होणार पात्र ।
स्रोतःस्थानीं मग दिसतिल प्रस्तरश्रेणि[1] मात्र ।
प्राणी कोणी निकट तव ते नाहिं येणार जाण ।
आसन्नांता[2] ! त्यज मद; वचें मान माझीं प्रमाणें ॥ १ ॥
देती मोदें कुसुमित लता आज पुष्पांजलीतें, ।
वारा वारी तृण-चवर हें, तेज शोभे जलीं तें ।
जाणारें हें सकल परि गा ! अन्युपुष्टा ! लयाला ।
अन्यांसाठीं तरि सुविनयें आज वेंचीं तयाला ॥ २ ॥
गर्वे चित्तीं गणिसि अधुना आपणाशीं नदीनें[3] ।
जातां मासत्रय परि पुढें होसि गा ! दीनदीन. ।
आली लक्ष्मी तुज घन-कृपें, वृत्ति तूं गोड ठेव. ।
होई मान्य प्रियहि सकलां, कीर्तिची जोड ठेव ॥ ३ ॥

बा. अ. भिडे.

( वर्षाकालांतील ओढ्यास उद्देशून. )

८

हा ! हंत ! हंत ! कविते अभगे मदीय ।
दुर्दैव दुःसह तुझें, तुज भाग होय ।
येणें बळेंचि कवितात्मक-शोकरंगीं, ।
या मर्त्य-लोक-मणिच्या निधन-प्रसंगीं ॥ १ ॥
पृथ्वीतल-प्रचलिता पृथु आंग्लवाणी ।
जी मानिनी नच गणी निज अन्य कोणी ।
ती रानडे-कुलशिखा-मणिनेंच केली ।
सेवावया सतत तत्पर पादधूली ॥ २ ॥
वर्णां अलंकृतिगणां रससंचयास ।
जीच्या बघोनि सुरही भुलतात खास ।
गीर्वाणवाग्ररमणिच्या हृदयास मोह ।
पाडी जनीं अतुल हा नरसिंह-सिंह ॥ ३ ॥

---

१ दगडांची रांग. २ आसन्न+ अंत. ३ नदी+ईन ( समुद्र ).

त्याचे मनीं सकल वाङ्मयता मराठी ।
प्रेमें वसे रचुनि दुर्घट पूर्ण गांठी ।
पाश्चात्य–पूर्वधरणी[1]–स्मृति–शास्त्र–लीला ।
त्याचे करी स्मरण–मंदिरिं नित्य लीला ॥ ४ ॥
विंयां अनेक गमतें रसनामिषानें ।
त्याचे मुखीं करुनि वास महासुखानें ।
होतात संप्रति निराश्रित हाय ! हाय ! ।
शोधावया जगतिं हिंडति योग्य ठाय ॥ ५ ॥

काव्यरत्नावली–राधारमण.
( कै. म. गो. रानडे. )

९

## कटाव.

यापरि मद्राधिराजपुत्री, गुर्वनुमंत्रित ती सावित्री, कोमलगात्री, विश्रुत सर्वजनीं स्वचरित्रीं, व्रतनियमादिककृच्छ्रपवित्रीकृतान्तरा, धन्यायितधात्री, तुष्टकृतांतप्रसादपात्री, स्वानुरक्तपतिनिधननिहंत्री, वनासि जाया, अनुगुणजाया, पडल्या समया स्वकीय काया, काष्ठलोष्टसम[2] परित्यजाया, अग्निकाष्ठही भक्षुनि जाया, पति रक्षाया, तया सवें रमणीय वनश्री पहावयाच्या मिषें निघाली, परी अंतरीं चिंताग्नीची ज्वाळा उठली, तिची धगधगी स्पष्ट उमटली, मुखावरी पांडुरता आली, परि नच डगली, पतिरिपुशीं झगडाया सजली, पतिच्या मागोमाग चालली, पळभरही तद्विरहा भ्याली, पदोपदीं जे परोपरीचे वृक्ष भेटले, फळीं दाटले, किंवा सुमभारानें नटले, सुंदर लतिका मृदुल वल्लिका, वृक्षदेह कवटाळुनि ठेल्या, गुच्छस्तबकें बहुत शोभल्या, त्यांच्या त्यांच्या पुष्पफलाविषयींची पृच्छा, करित करित ती, करासन्न[3]फलपुष्पें वेंचित, वन्य खगांचें मधुरगीत आनंदें परिसत वनगर्भीं आली, एका वृक्षतलीं बसली ॥ १ ॥

ग. ज. आगाशे. सावित्री आख्यान.

---

१ देश. २ मतीचें ढेंकूळ ३. कर+आसन्न+फल पुष्प.

१०

पाहुनि विशाल तव देहातें, प्रचंडही वेगातें।
निश्चित मनिं दिङ्नाग लाजुनी सांडतील गर्वातें ॥ १ ॥
नानापरिंचे रंग चमकती जयांत, तें इंद्राचें ।
धनु तव नील, शरीरावरतीं विलसे सुंदर साचें ॥ २ ॥
शिखिपिच्छांचा मुकुट शिरावरि घालुनि यदुपति जैसा ।
वृंदावनपरिसरीं शोभला, घना, शोभाशिल तैसा ॥ ३ ॥
भृकुटिविलासां नेणति किमपिहि, परि जीं प्रेमें पूर्ण ।
क्षेत्रपालिका[1] नयनें तुजला कारितिल खचित निर्गीर्ण[2] ॥ ४ ॥
तच्छ्रम होणें सफल सकल हें, घना, तुजवरी आहे ।
यास्तव कर्षणसुगंधयुक्तीं मालीं क्षणभर राहे. ॥ ५ ॥
ज्याच्या वृष्टीकरुनि शमविला त्वां दावानल रानीं ।
आम्रकूट[3] तो तुजला धारण करील निजशिखरांनीं ॥ ६ ॥
साधारण ही नर स्मरतसे केलेले उपकार, ।
तुजविषयीं तो कैसा होईल कृतघ्न जो अतिथोर ॥ ७ ॥
पक्कफल अशा आम्रतरूंनीं अच्छादुनि तट गेलें ।
ज्याचें तव संबंधें शिर ही नीलवर्ण बहु झालें ॥ ८ ॥

चिपळूणकर—पद्यरत्नावलि पूर्वमेघ.

११

राज्यातें अज तो करीत असतां जाले दरिद्री धनी; ।
रोगी रोगविहीन; बालिश रत ज्ञानांचिया साधनीं; ।
गाई त्या घटदोहनी; बहुरसा सस्यावृता[4] मेदिनी; ।
यूपस्तंभसमन्विता[5][6] हि सरयू लोकत्रयाल्हादिनी ॥ १ ॥
दिव्यस्वादुफलाढ्यभूरुहलता संशोभती पुष्पिता; ।
आत्मापत्यमृतिप्राति[7] क्षितितळीं पाहे न मातापिता; ।
वंध्या लब्धबहुप्रजा सकलही वर्ण स्वधर्मीं रत; ।
श्रीरामाख्य सुधेसि कर्णचषकें पीति सुखें संतत ॥ २ ॥

---

१ शेतकऱ्यांच्या बायका. २ गिळून टाकलेला. ३ अमरकंटक पर्वत. ४ धान्य. ५ यज्ञार्थ खांब. ६ युक्त. ७ आत्म+अपत्य+मृति+प्रति.

पापातें न वसावया स्थळ दिसे, कोण श्रमाला पुसे ? ।
नाहिं आश्रय यास्तव क्षितितळीं चिंता सचिंता वसे; ।
विघ्नातें बहु विघ्न होति; रुसली भीति त्रिलोकीं बरी; ।
साकेतीं रघुनाथ सानुजसुहृद् राज्यासि जेव्हां करी ॥ ३ ॥

मोरोपंत.

१२

सुवर्णचरणांकिता श्रवणरंजनीं तत्परा ।
प्रिया परम कोमला गुणगणाश्रिता सुंदरा ।
सुरीतिनय–धर्मिणी नवरसामृतस्यंदिनी ।
प्रमोहलहरी अशी सुकविकन्यका ये झणीं ॥ १ ॥
वये सुकविकन्यके कविमनोविनोदास्पदे ।
तुला बघुनि संचरे हृदयीं मोद गे तोषदे ।
अकिंचन जनाचिया सदनदेहलीला पदें ।
तुझीं सहज लागलीं म्हणुनि दीन नाचे मुदें ॥ २ ॥
सुवर्णमाणिभूषिता त्यजुनि चंद्रशाला अशी ।
स्वयें वरिशि आमुची अहह ! पर्णशाला कशी ? ।
रसाल बकुली वनीं सुमनसौरभानंद–दें ।
मनोरमलतागृहें सुखद होत हीं शर्मदें ॥ ३ ॥

लेंभे.

१३

मंदाकिनीमधिल जीं कनकारविंदें ॥
तीं जेवितों मृदुल–नाल–मृणाल–कंदें ॥
आह्मी असों नृप-सुते तरि कांचनाचे ॥
जें कार्य तें धरिल कीं गुण कारणाचे ॥ १ ॥
जो मानसीं विहरतो विहरो परी तो ॥
कां आमुची कुलसती असती करीतो ॥

---

१ (अयोध्येंत). रा. रा. गोविंद वासुदेव कानिटकर बी.ए. एल्. एल्. बी. यांच्या संमोहलहरी ' काव्याच्या आगमनाचें वर्णन रा. रा. विठ्ठल भगवंत लेंभे यांनीं केलें आहे. २ कुलकीर्ति. ३ खोटी.

राखीं नळा विजययशोमय-हंस राया ॥
आलों महीवर फिराद् अशी कराया ॥ २ ॥
मी गुंतलों नळ-महींद्र-गुणौघ-पाशीं ॥
सेवेसही मग करोनि तयाच पाशीं ॥
आलोकुनी कवण या चतुरा न नाचे ॥
लोकेशता विभवही चतुराननाचे ॥ ३ ॥
एकांत लेखनाहि वाचनही करीतो ॥
माझी तनुद्युति समीप तदा धरीतो ॥
याकारणें नळ मला बहु आप्त मानी ॥
तो सांगता निजमनोरथ होय कानीं ॥ ४ ॥
आधींच नैषधकथा नवनीत-भेला ॥
होता अलंकरणरूप इच्या जिभेला ॥
हंसोदयें[1] विघरतां अधरीं धरी ते ॥
स्वीकारितां वचन तें मग आदरी ते ॥ ५ ॥

रघुनाथ पंडित–नलदमयंती–स्वयंवराख्यान.

१४

वदोनीयां ऐसें मग रणिं कुशालागिं हटकी ।
म्हणे ‘ बाळा ! आतां शरण मज ये सांडि हट कीं ।
इषू माझे आतां धनुशिंतिहुनी नाहिं सुटले ।
त्वरें दे सोडूनी समरिं धरिले वीर पहिले ॥ १ ॥
गर्वशब्द ऐकतांचि कूश काय बोलिला ।
‘ मारितां गपा परंतु सर्व ठाउकें मला ।
युद्धिं जैं दशाननें तुम्हांसि शक्ति घातली ।
तूमची तनू तधींच प्रेतरूप जाहली ॥ २ ॥
दैवें रुद्रें[3] येत द्रोणपर्वतासि घेउनी ।
वल्लि घालितां मुखांत वांचलेत ते क्षणीं ।

---

१ सूर्योदयें पक्षी हंस गमनानें. २ धनुष्याच्या दोरीपासुन. ३ मारुत.

नासिकीं[1] निशाचरी तुम्हीं करीं विटंबिली ।
कीर्ति नाहिं वाढली, अकीर्ति फार जोडिली ॥ ३ ॥
ऐकतां कठोर शब्द शेष[2] तो उठावला ।
चाप वोढुनी करें सुतेज बाण सोडिला ।
बाण सोडितांचि तो कडाडला दिगंतरीं ।
एक सायकें असंख्य जाहले महीवरी ॥ ४ ॥

अनंत कविकृत—कुशलवाख्यान.

१५

वाटे या जनाचें थोर वा आश्चर्य । न करिती विचार कां हिताचा॥१॥
कोण दम ऐसा आहे यांच्या पोटीं । येईल शेवटीं कोण कामा ॥ २ ॥
काय मानुनियां राहिले निश्चिंतीं । काय जाब देती यमदूतां ॥ ३ ॥
कां हीं विसरलीं मरण बापुडीं । काय यांसी गोडी लागलीसे ॥ ४ ॥
काय हातीं नाहीं करील तयासी । काय जालें यांसी काय जाणें ॥५॥
कां हीं नाठविती देवकीनंदना । सुटाया बंधना पासूनियां ॥ ६ ॥
काय मोल यासी लागे धनवित्त । कां हें यांचें चित्त घेत नाहीं ॥ ७ ॥
तुका ह्मणे कांहीं भोगितील खाणी[3] । कां त्या चक्रपाणी विसरलीं॥८॥

तुकारामाची गाथा.

१६

जाणिजे परमात्मा निर्गुण । त्यासीच ह्मणावें ज्ञान ।
त्यावेगळें अज्ञान । सर्व कांहीं ॥ १ ॥
पोट भरावया कारणें । नाना विद्या अभ्यासकरणें ।
त्यासीं ज्ञान ह्मणती । परी तेणें सार्थक नव्हे ॥ २ ॥
देव ओळखावा येक । तेंचि ज्ञान तें सार्थक ।
येर अवघेंचि निरर्थक । पोटविद्या ॥ ३ ॥
एवं पोट भरावयाची विद्या । तयेसी ह्मणों नये सद्विद्या ।
सर्वव्यापकवस्तु सद्या[4] । पाविजे तें ज्ञान ॥ ४ ॥
ज्ञानें चुकें जन्ममरण । सगट बोलणें अप्रमाण ।
वेदशास्त्र आणि पुराण । मग कासयासी ? ॥ ५ ॥

---

१ नाशिक मक्कामीं ( जनस्थानांत ). २ लक्ष्मण. ३ जन्म. ४ तत्काळ.

प्राणी व्हावया मोकळा । आधीं पाहिजे जाणीव कळा ।
सकळ जाणतां निराळा । सहजचि होये ॥ ६ ॥
कांहींच नेणिजे तें अज्ञान । सकळ जाणिजे तें ज्ञान ।
जाणीव राहातां विज्ञान । स्वयेंचि आत्मा ॥ ७ ॥

रामदास–दासबोध.

१७

कौंतेयाप्रति देवकीय वदला, ' हे भागले वाह रे ।
जाले फार तृषार्त, यत्न करणें जेणें पिपासा हरे.' ।
बोले पार्थ, ' जलासि यांसि, जपतां मी वारुणास्त्रा रणीं ' ।
या वीरांसहि वारितों, गज जसे सक्रोध आधोरणीं ' ॥ १ ॥
तत्काळ बाणीं रचलीच पार्थें वारोनियां वीरचळें अपार्थें ।
केलें युगापासुनि मुक्त देवें गवेंचि ते घोटक वासुदेवें ॥ २ ॥
आकृष्ट हय पाजुनि पाणी, दों करीं चतुर नीरजपाणी ।
देखती कुतुक सैनिक सारे, बोलती, ' प्रबल पार्थ कसा रे ? ' ॥ ३ ॥
धों धों दुंदुभि वाजल्या, उचलला सैन्यीं धुरोळा नभा ।
गेला, सर्व दिशा तमोमय, पहा जाला रवी हीनभा ।
' सारावा व्यसनस्थ पार्थ ' वदती ' आहे रथावेगळा, ।
होतां सज्ज कदापि हा न उतरे काळाचियाही गळा ॥ ४ ॥
' पार्था ! बा ! रवि हा, जयद्रथाहि हा हें लक्ष लावीं बरें. ' ।
बोले अर्जुन ' लाविलें. ' हरि वदे, ' मारीं ' जगच्छेखरें ।
ऐसें त्याप्रति बोधितां, झडकरी त्या सैंधवाचा गळा ।
गेला तोडुनि अर्धचंद्रविशिखें कीं मस्तका वेगळा ॥ ५ ॥

वामनपंडित–जयद्रथवध.

१८

पापांचे बहु दाट कांट चढले फारा दिसांचे लया ।
नेत्ये, सर्व मना पुन्हा मिळवितां तैसें न सांचेल या ।

१ महात २ हताश ३ पाश. ४ जयद्रथ, ५ शर.

दे आह्मां कुतुकें परेष्टकरणोद्योगीं फुका जी भरे ।
सन्मान्या चिरजीविनी तुझि असो ती निंदका जीभ रे ॥ १ ॥
घेती माथां परांचा दुरितभर बळें, तुल्य थोरीं लहानीं ।
देतीं पुण्यें सुकष्टें करुनि मिळविलीं, मानिती ही न हानी, ।
एवं ज्यांची परार्थ स्थिति सदुपकृती सज्जना सोयरीं तीं ।
साजे निंदा तिला हीअजि कविजन हो! हे बरी होय रीती?॥२॥
आह्मां श्रीरामभक्तां अजिततनुविणें स्वस्तुती तों न अर्हा ।
पापघ्नी पुण्यदात्री करिशिल जरि तूं निंदका ! होय गर्हा ।
मानूं तोषा न रोषा परि ह्मणति तुह्मां निंदका वेद ‘ वाटे
स्वर्गाच्या चूकले हे पडतिल नरकीं ! ’ हा मना खेद वाटे॥ ३ ॥
मोरोपंत. ( निंदक )

१९

## चूर्णिका.

ऐशिया ऋषिराजसमूहामाझारी विराजमान, विद्वज्जनसार्वभौम, विमलांतःकरण, विश्वविख्यात, महानुभाव, सिद्धाश्रमविहारी, जो महातपाचा तेजोराशि, परंतु उदयास्तावेगळा; आल्हादकारक कलानिधि, परंतु वृद्धिक्षयारहित, नित्यागळा; अत्यंत समर्थ शतक्रतु[१], परि नातळत परदारपातकविटाळा; सृष्टिकर्ता चतुरानन, परंतु निजदुहितागमनदोषनिराळा; असो, ऐसा परमपवित्र विश्वामित्र सुकृतराशि, स्वयंवरविलोकनविलासी, धर्मादिसद्गुणोत्कर[२]रजनकें विदेहदेशाधिपजनकें, देखोनि, साष्टांग दंडवत वंदिला. ॥

आनंदतनय–सीतास्वयंवर.

२०

मज चालतां आयुष्यपंथें । तारुण्यवन पातलें तेथें ।
मदमत्सरादि श्वापदें बहुतें । आलीं कळकळी[३]त मजपाशीं ॥ १ ।

१ इंद्र. २ खाण. ३ क्षुधेनें व्याकुळ झालेलीं.

तीं धांवनी पाठोपाठीं । पाहे तंव विषयाचे घाटीं ॥
कामक्रोधव्याघ्रांची वार्टा । देखोनि पोटीं रिघाले पाय ॥ २ ॥
मग स्वधर्ममार्गीं रिघालों । तंव अहंकारतस्करें आकळिलों ।
राहें राहें ह्मणोनि उभा केलों । तेणें अंतरलों स्वामिया ॥ ३ ॥
जंव क्षण एक उघडिले डोळे । पाहें तंव कंठ व्यापिला व्याळें ।
माया मोहसर्पीं डंखिलें । त्यांचियें गरळें झंळंबलों ॥ ४ ॥
जंव न पवेल शेवटील लहरी । तव धांव उपाव करी ।
विष्णुदास नामा धांवे पुकारी । माझा कैवारी केशिराज ॥ ५ ॥

नामदेव–अभंग–गाथा.

२१

जितेंद्रिय, सदाचारी, । क्षमाशिल, परोपकारी ।
परगुणपरीक्षा सुविचारी । दयावंत सर्वदा. ॥ १ ॥
इहीं लक्षणीं जे पुरते । 'श्रोते' ऐसें बोलती त्यांतें ।
ग्रंथींचा अर्थ काढूनी हातें । हृदयीं लेवूं जाणती ॥ २ ॥
त्यांहीं लिहिलें शासनपत्र । जेवीं पाषाणीं कोरिलें चित्र ।
कीं विंधिलें घटिकायंत्र । मिळों नेणे कल्पान्तीं ॥ ३ ॥
वाचोनी अभिषेकपात्रापाडें । गळोनी होय कोरडें ।
पद्मपत्रीं पडे न पडे । तैसा ढळे घनबिंदू ॥ ४ ॥
रोंवोनी उपडितां दाभणा । छिद्र शोधितां न दिसे कोणा ।
हृदयशून्य तैसे जाणा । अनधिकारी अश्रोते ॥ ५ ॥
तुंबीफळ बुडाविलें जळीं । राहे जंव धरिलें करतळीं ।
रोधिलें चित्त घे उसाळी । कथा संपतां अवलोकीं ॥ ६ ॥
स्वातितोयबिंदुकणिके । शुक्तीं मुक्ताफळची पिके ।
कीं उदकीं सिंतोडा न देखे । तैल जैसें विस्तारे ॥ ७ ॥
तैसा श्रवणीं पडतां शब्द । अर्थगर्भ वाढे विशद ।
प्रतिपळीं प्रसवे बोध । सिंधु जैसा लक्ष्मीतें ॥ ८ ॥
ऐसिया समर्थ श्रोतिया । मान केला बैसावया ।
अश्रोते अनधिकारियां । ठाव तेथें न मिळेची ॥ ९ ॥

मुक्तेश्वर–आदिपर्व–श्रोते.

---

१ विषबाधा झाली आहे. २ ताम्रपट. ३ भोपळा.

२२

तुज वर्णी ऐसा तुजविण नाहीं ॥ दुजा कोणी तिहीं त्रिभुवनीं ॥ १ ॥
सहस्रमुखें शेष सिणला बापुडा ॥ चिरलिया धडा जिव्हा त्याच्या ॥ २ ॥
अव्यक्ता अलक्षा अपारा अनंता ॥ निर्गुणा सचिता नारायणा ॥ ३ ॥
रूप नाम घेसी आपुल्या स्वइच्छा ॥ होसी भाव तैसा त्या कारणें ॥४॥
तुका ह्मणे जरी दाविसी आपणा ॥ तरिच नारायणा कळों येसी ॥ ५ ॥

---

तरुवर बीजापोटीं ॥ बीज तरुवरा सेवटीं ॥ १ ॥
तैसें तुह्मां आह्मां जालें ॥ एकीं एक समावलें ॥ २ ॥
उदकावरील तरंग ॥ तरंग उदकाचें अंग ॥ ३ ॥
तुका ह्मणे बिंबच्छाया ॥ ठायीं पावली विलया ॥ ४ ॥

तुकाराम

२३

यावरी पातला वर्षाकाळ । पंचम[1] ऋतु झाला प्रबळ ।
सुटला पश्चिमेचा अनिळ । मेघमाला मोकली ॥ १ ॥
पृथ्वीमंडळींचा जळराशी । पारधी पातला आकाशीं ।
पिटीत मृगांचे पाठिशीं । सैरा गगनीं धांवत ।
इंद्रचाप धरूनी मुष्टी । रोहिणी मृगांचिया पाठीं ॥
मेघ धाराजीवनवृष्टी । करीत वेगें पातला ॥ ३ ॥
सूर्यकिरणमृगसमुदाय । निस्तेज होउनी पावले भय ।
लपावया शोधीत ठाय । अभ्रें आड करूनिया ॥ ४ ॥
कीं पृथ्वीखंड त्या शाळुंका । अनेक पर्वत शिवपिंडिका ।
इंद्रें मंडिलें अभिषेका । गगनपात्रीं बहुधारा ॥ ५ ॥
मयूर, चातक, कपोतक, । दर्दुर करिती महाघोष ॥
'मेघ जगाचा पाळक' । सर्वलोकां जाणविती ॥ ६ ॥

---

१ ऋतु मार्गशीर्षा पासून मोजण्याची चाल होती. ( मासानां मार्गशीर्षोऽस्मि गीता. ).

विद्युल्लतांचे कडकडाट । घनगर्जना गडगडाट ।
गंगादिसरितांचे संघाट । महापूर माजले ॥ ७ ॥
आठरा भार वनस्पती— । अंकुरवसनें वेढिली जगती ।
फळ शाका धान्य संपत्ती । पृथ्वी पिके जगातें ॥ ८ ॥

मुक्तेश्वर–वनपर्व–वर्षाकाळ.

२४

पाहें पां दिवसु अवघा सरे । मग रात्रीची वारी उरे ।
वांचूनि कांहीं तिसरें । नाहीं जेवीं ॥ १ ॥
तैसें ज्ञान जेथ नाहीं । तें अज्ञानच पाहीं ।
तरि सांगों कांहीं कांहीं । चिन्हें तियें ॥ २ ॥
तरि संभावनें जियें । जो मानाची वाट पाहे ॥
सत्कारें होये । तोषु जया ॥ ३ ॥
गर्वें पर्वताचीं शिखरें । तैसा महत्वावरूनि नुतरे ।
तयाचिया ठायीं पुरें । अज्ञान आहे ॥ ४ ॥
आणि स्वधर्माची मांगळी । बांधे वाचेच्या पिंपळीं ।
उभिला जैसा देउळीं । जाणोनि कुंचा ॥ ५ ॥
घाली वियेचा पसारा । सुये सुकृताचा डांगोरा ।
करी तेतुलें मोहरा । स्फितीचिया ॥ ६ ॥
आंग वरी वरी चर्ची । जनातें अभ्यर्चितां वंची ।
तो जाण पां अज्ञानाची । खाणी एथ ॥ ७ ॥
आणि वन्हि वनीं विचरे । तेथ जळती जैसीं जंगमें स्थावरें ।
तैसें जयाचेनि आचारें । जगा दुःख ॥ ८ ॥
कौतुकें जें जें जल्पे । तें साबळांहूनि तिख रुपे ।
विषाहूनि संकल्पें । मारकु जें ॥ ९ ॥
तयातें बहु अज्ञान । तो अज्ञानाचें निधान ।
हिंसेसि आयतन । जयाचें जिणें ॥ १० ॥

ज्ञानेश्वरी–अज्ञान्याचीं लक्षणें

पिंपळाची मुंज करून पार बांधतात तो. २ आवड. ३ मान. ४ पहार. ५ घर.

२५

तैसें घडतें प्रमेय घेइजे । उणें तें मज देइजे ।
जें नेणणें हेंचि सहजें । रूप कीं बाळा ॥ १ ॥
तरि नेणतें जऱ्ही होये । तऱ्ही देखोनि बाप कीं माये ।
हर्ष केंव्हीं न समाये । चोज करिती ॥ २ ॥
तैसे संत माहेर माझें । तुह्मीं मिनलिया मी लाडें जें ।
तेंचि ग्रंथाचेनि व्याजें । जाणिजो जी ॥ ३ ॥

---

परी प्रौढी न बोलों होजी । तुम्हां सर्वज्ञांच्या समाजीं ।
देयावें अवधान हे माझी । विनवणी सलगीची ॥ १ ॥
प्रभू तुम्ही सुखामृताचे डोहो ।
ह्मणोनि आम्हीं आपुलिया स्वेच्छा वोलावो[1] लाहों ।
येथही जरी सलगी करूं बिहों[3] । तरी निवों कें पां ॥ २ ॥
नातरी बालक बोबडां बोलीं । वांकुडा विचुका पाउलीं ।
तें चोज करूनि माउली । रिझे जेवीं ॥ ३ ॥
तेवीं तुह्मा संतांचा पढियावो[4] । कैसेनि तरी आह्मांवरी हो ।
या बहुवा आळुकिया जी आहों । सलगी करित ॥ ४ ॥
वांचूनि माझिये बोलतिये योग्यते । सर्वज्ञ भवादृश श्रोते ।
काय धड्यावरी सारस्वतें । पढों सिकिजे ॥ ५ ॥

ज्ञानेश्वरी.

---

१ पाणी. २ मिळवूं. ३ भिऊं. ४ प्रीति. ५ आशा. ६ गणपति.

# गद्यानुवादाचीं उदाहरणें.

१

ज्या भाषेंत तुकाराम रामदासांसारख्या भगवत्परायण साधूंनीं आपले श्रुतिवंद्य[1] अर्थ ग्रथित केले, जीस मुक्तेश्वर, वामनपंडित, मोरोपंत इत्यादि कवींनीं आपल्या रसाळ व प्रासादिक वाणीनें संस्कृत भाषेचीच प्रौढी आणिली, त्या भाषेस आवेश, गांभीर्य व सरसता या गुणांकरितां कोणत्याही अन्य भाषेच्या तोंडाकडे बघण्याची खास गरज नाहीं. अशी आमची खात्री आहे; हें मत कोणास उगीच फुशारकीचें वाटूं नये ह्मणून सर्वांस खात्रीनें कळवितों कीं, ज्या कोणास आपल्या भाषेची खरी योग्यता जाणण्याची इच्छा असेल त्यानें मोलस्वर्थ व क्यांडी यांच्या कोशांतील प्रस्तावना वाचून पहाव्या. परंतु मोलस्वर्थसारख्याचें मत कसेंही असलें तरी तें त्यांच्या कोशांतल्या कोशांत तें वाचून कोणी पहावें ? असो; या प्रमाणें स्वभाषेच्या लज्जास्पद अज्ञानास्तव व दुरभिमानास्तव आजपर्यंत मराठी भाषेची फारच हयगय होत गेली. व ज्यांनीं तिच्या अभिवृद्ध्यर्थ निरंतर उत्साहानें झटावें, त्यांच्यांत सुस्ती, कृतकृत्यताबुद्धि[2] पंडितंमन्यता[3], वगैरे दोष अखंड वसल्यामुळें तिची मोठी हानि होऊन ती क्षयाच्याच पंथास दिवसेंदिवस लागत चालली आहे.

निबंध माला—मराठी भाषेची सांप्रतची स्थिति.

---

१ वेद. २ इतिकर्तव्यता झाली असें वाटणें. ३ विद्वत्तेचा वृथा गर्व वहाणें.

२

स्वास्थ्य आणि समाधान, विश्रांति व सुख, हीं पाहिजे त्यास आपल्या ग्रंथमंदिरीं प्राप्त होतात; फक्त त्याच्याजवळ त्याचें द्वार उघडण्याची सुवर्णकिल्ली मात्र असली पाहिजे. पुस्तकालय हें एक इंद्रभुवन, अथवा प्रत्यक्ष आनंदमंदिर, अथवा भवसागरांतील वादळें व तुफानें यांजपासून रक्षण करणारें बंदर होय. राजा व रंक यांस त्यांचा सारखाच उपयोग होतो, कारण येथें संपत्तीस प्रतिष्ठा नाहीं. सदुपयोग केला तर त्याच पुस्तकालयास पृथ्वीवर असतांही आपण स्वर्ग बनावून सोडूं ! येथें जगद्विख्यात राज्यधुरंधर, कवि ज्ञानी यांची व आपली मुलाखत होते; मोठ्या विवेकी पुरुषांच्या विचारांचीं ओळख होते, व अत्यंत उदात्त बुद्धिमत्तेच्या कल्पनासृष्टीच्या[1] वैभवाचा आपणांस उपभोग घेतां येतो.

कृ. प. गाडगीळ—संसारसुख.

३

ज्ञान प्राप्त होण्याचें मुख्य साधन ह्मटलें ह्मणजे श्रवण हें होय. मनुष्यास वाणी ही एक अमोलिक वस्तु परमेश्वरानें दिली आहे, तिच्या योगानें आपले हृद्गत[2] त्यास दुसऱ्यास सुलभतेनें कळवितां येतें. मनुष्याच्या ठायीं ज्ञानाचा जो सांठा नित्य होत जातो, त्यास आद्यद्वार[3] ह्मटलें ह्मणजे श्रवणव्यापार[4] होय. विद्येंत जो प्रथम प्रवेश व्हावयाचा, तो तरी गुरुमुखांतून निघालेली वाणी ऐकूनच

---

१ कल्पनेनें निर्माण केलेले ग्रंथ. २ मनोगत ३ मुख्य मार्ग. ४ कानाचें कार्य, ऐकणें.

होत असतो, हें सुप्रसिद्धच आहे. व लेखनकला निघण्याच्या पूर्वी ज्ञानाचें साधन श्रोत्रेंद्रियच काय तें एक होतें. पुढें लिहिण्याची युक्ति निघाल्यावर, ज्ञानाचा प्रसार होण्यास व तें चिरकाल रहाण्यास, कोणतें नवें साधन झालें, हें आज कोणासही सांगावयास नकोच.

मुं. यु. पेपर. १९०३--४.

४

मनोरंजनार्थ सुंदर काव्य करण्याचा यथार्थदीपिकाकारांचा हेतुच नव्हता. भगवदुक्तीचा खरा खरा अर्थ लोकांना अगदीं स्पष्ट करून सांगण्याचेंच कंकण, बांधल्यामुळें, त्यांनीं कल्पनेच्या उड्यांना फारसा वाव दिलेला नाहीं. प्रत्येक दृष्टांत रूपक उपमा हीं केवळ अर्थ व्यक्त करण्याच्याच उद्देशानें योजिलीं असल्यामुळें, पंडितांनीं त्यांचीं अगदीं फोड करून टाकिली आहे. कोणतीही गोष्ट जराशी गुलदस्तांत ठेवून वाचकांच्या कल्पना शक्तीस वावरण्यास बिंदुमात्रही जागा ठेविलेली नाहीं. नेहमीं अनुभवास येणाऱ्या गोष्टी व मूर्त पदार्थ यांविषयींच सर्व दृष्टान्त वगैरे आहेत. केवळ कल्पनागम्य, अमूर्त किंवा अपरिचित उपमादृष्टांतादिकांनीं वाचकाच्या मनोवृत्ति व जिज्ञासा या चाळविल्या जातात व ग्रंथांत एक प्रकारची विलक्षण जादू उत्पन्न होते. केवळ आभासानेंच मन आनंदांत पोहूं लागतें. पण जादूगाराच्या खेळांत जशी प्रेक्षकांची, तशीच अशा तऱ्हेच्या

१ वामनाची गीतेवरील ओंवीबद्ध टीका. २ श्रीकृष्णाच्या सांगण्याचा. ३ मोकळीक. ४ गुप्त. ५ दृश्य. ६ कल्पनेनेंच समजणारे. ७ भूल.

मनमोहनग्रंथात वाचकांची कल्पना स्वैरें भरारूं लागते. व यथार्थ ज्ञानाला वारंवार एक प्रकारची संदिग्धता व भ्रमकता येऊं लागते. काव्याचें जीवन व मर्म तें हेंच आहे. परंतु पंडितांना काव्य रचावयाचें नव्हतें, किंवा केवळ कल्पनागम्य गोष्टींनीं वाचकांना भ्रमवून त्यांचें चित्तरंजन करावयाचें नव्हतें. हाच पंडित व ज्ञानेश्वर यांतील मुख्य भेद आहे.

बा. अ. भिडे. वामनपंडित.

५

नंतर निजामन्मुलुख पुढें गेले होते त्यांच्या व पातशहाच्या भेटी झाल्या. तेव्हां पातशहा मोठ्या गुस्शांत येऊन नबाबास बोलिले कीं, " ही तुमची रीत ! कीं दहा दहा वर्षेपर्यंत तुमचा पैका सरकारांत दाखल नाहीं व हिशेबही नाहींत, व तुह्मांस हुजूर येण्याची गरज देखील नाहीं ! ! असे तुह्मी जोरावर होऊन सरकाराशीं मस्ती करितां हें नीट नाहीं. " असा सारा मजकूर ऐकून घेऊन निजामन्मुलूख हात जोडून अर्ज करितात, " आह्मीं सरकारास बदमामलेची गोष्ट कधींही सांगितली नाहीं; परंतु दक्षिणेंत अशीं बंडें, यांचा बंदोबस्त राखावा, किंवा सरकारची पैरवी ठेवावी ? " अशा मतलबाचीं बोलणीं बोलून, " हल्लीं हें बंड आलें आहे; हुजूरची फौज गेली होती त्या फौजेचा मोड होऊन फौज पळून माघारी आली. हें बंड येऊन मूलखामध्यें धूम मांडली आहे, त्याचा बंदोबस्त सरकारानीं करावा; " असा अर्ज नबाबांनीं केला. इत-

१ वाटेल तिकडे. २ अस्पष्टता. ३ असत्यता. ४ रागांत. ५ दरबारांत, पातशहाकडे. ६ उद्धटपणाची गोष्ट, उलट जाबसाल. ७ जा ये करणें, भेट घेणें. ८ लुटालूट, बंड.

न्यांत बाहेरीलही बोभाट आले. त्यामुळें पातशहाची खातरजमा[1] झाली कीं निजामन्मुलूख वर्तमान सागतो हें खरें.

पेशव्यांची बखर.

६

ह्या अफाट जगांत तिलमात्र अशी जागा नाहीं कीं, तेथें सर्वज्ञ सर्व शक्तिमान्, परमेश्वराचें चातुर्य पहावयास सांपडणार नाहीं. विषयासक्त मनुष्यांस परमेश्वराचें ज्ञान होणें फार कठिण आहे; तथापि मनुष्य थोडा विचार करून सृष्टिरचनेकडे पाहील तर त्यास तींतील चमत्कार व सृष्टिकर्त्याचें चातुर्य यांचें आश्चर्य वाटल्याशिवाय राहणार नाहीं. मनुष्य किती कां अडाणी असेना, त्यानें थोडें लक्ष मात्र पुरविलें पाहिजे. असें केलें तर ईश्वराची अगाध करणी पाहून त्याच्या चित्तास समाधान झाल्याशिवाय रहाणार नाहीं. सृष्टिसौंदर्यापासून जें सुख होतें, तें शुद्ध सुख असतें. संसारांतील विषयसुख बहुधा दुःखस्पृष्ट[2] असतें तसें हें नसतें.

बापट–गद्यरत्नमाला.

७

श्री. ( चैत्रवद्य आमावास्या )

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री त्रिंबक हरी स्वामी गोसावी यांसी.

पोष्य माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार विनंती उपरी येथील कुशल, जाणोन स्वकीय लिहीत जावें. विशेष. नीलकंठराव हैदरखानाच्या युद्धांत निधन[3] पावले. ईश्वरें मोठें अनुचित केलें. तुह्मांवर वृद्धापकाळीं

---

१ खात्री. २ दुःखानें युक्त. ३ मरण.

दुःखाच्या कोटी झाल्या ईश्वरी तंत्रास उपाय नाहीं. ज्या काळीं जें होणार तें अवश्यमेव होतें. तथापि नीलकंठ रायांनीं अरीसमरीं[1] नी सन्मुख होऊन स्वामिसेवेवर जीवित्व तृणप्राय करून देह विसर्जन केला. 'मृत्युंचापि सुरांगना;' हेंच लक्ष त्यांचें. तद्योगें तसेंच घडलें झाल्या गोष्टीचे श्रम केल्यास श्रमाची सार्थकता येत नाहीं. एतद्विषयीं विवेकच प्राधान्य आहे. तुह्मीं विवेकी आहां. विवेक करून परिमार्जन[2] करावें. नीलकंठरायांनीं सर्व प्रकारें सार्थकच केलें. अतःपर श्रम न करावे. जाणिजे. छ. २९ जिल्हेज[3]. सुरु सन इहिदे सबैन मय्या अल्लफ बहुतकाय लिहिणें. हे विनंति.

पै. छ ७ सफर सन्न मजकूर

खरे. ऐतिहासिकलेखसंग्रह.

८

जिन्हाग्रीं साक्षात् वागीश्वरी[4] स्थापून स्वामींनीं, अमेरिका व इंग्लंड ह्यांसारखे सर्वकलासंपन्न व ज्ञानाच्या कळसास पोंचलेले देशांससुद्धां डुलवयास लावलें, हें तर हल्लीं सर्वांस विदितच झालें आहे. तेव्हां त्यांचें माहात्म्य काय सांगावें? त्यांनीं अध्यात्मिक[5] ज्ञानानें भरलेलीं व्याख्यानें दिलीं. आणि अमेरिकेंतील व इंग्लंदांतील श्रोतृवृंदांच्या[6] चित्तवृत्ती हिरावून घेतल्या. तो, स्वामींचा अनुभविक ज्ञानाचा अस्खलित व हृदयंगम वक्तृत्वाचा; बहुश्रुत व भारदस्त विवेचनाचा मथून मथून हृदयांत सत्याचा प्रकाश पाडणाऱ्या, आत्म्यास आ

१ शत्रुशीं लढतांना टाकिला २ दुःख घालवावें ३ जिल्हेज १२ वा महिना; इहिदे १, सबैन ७०; मय्या १००, अल्लफ १०००; सफर २ रा. महिना ४ सरस्वती. ५ आत्म्यासंबंधीं; ईश्वरसंबंधीं. ६ समुदाय. ७ एकसारखा.

दाचा चटका लावून सोडणाऱ्या आणि नादान चोंचल्यावर मृदु पण कठोर प्रहार करीत जाणाऱ्या विनोदी भाषणाचा लाभ खरोखरीच अनुपमेय होय ! तेव्हां अर्थातच ह्या सृष्टिचक्रांत भ्रमण पावलेल्या मानवांच्या अंतःकरणांत जमलेलीं अज्ञानपटलें पार काढून टाकून, स्वामींनीं सत्य सूर्याचीं प्रकाशकिरणें आंत शिरकविलीं आहेत, असें ह्मटल्यास वावगें होणार नाहीं.

भक्तियोग.

९

राज्यकारभारात नानांस अद्यापि ह्मणण्यासारखा अनुभव नव्हता. तथापि असल्या जबाबदारीचें काम शिरीं घेण्यास जी योग्यता लागते ती त्यांनीं संपादिली होती. नानासाहेबांच्या कारकीर्दीत मराठ्यांच्या वैभवाचा अगदीं कळस झाला होता. नानांनीं तें वैभव आपल्या डोळ्यांनीं पाहिलें असून त्याबद्दल ते अभिमान बाळगीत. बाळाजी विश्वनाथांच्या घराण्याविषयीं भानूंची एकनिष्ठता त्यांच्याहि अंगीं असून माजी पेशव्यांच्या निकट संबंधानें ती दृढतर झाली होती. पेशव्यांजवळ नेहमीं राहणें असल्यामुळें राज्यांतील मोठमोठे मुत्सद्दी, सरदार व सावकार यांशीं अनायासानें संघट्टण पडून त्यांच्या स्वभावांचीहि नानांस थोडीबहुत ओळख झाली होती. राज्यव्यवस्थेच्या कामीं खुद्द नानासाहेब, भाऊसाहेब अशा धुरंधर मुत्सद्यांचीं उदाहरणें त्यांच्या नजरेसमोर होतीं.

मुं. यु. पेपर. १९००–०१

---

१ मूर्खपणाचे. २ वेडे चाळे. ३ अज्ञानाचे पडदे. ४ प्रमुख.

१०

ज्यास संस्कृत भाषेचा परिचय नसतो, त्याच्याजवळ हिंदूच्या काव्याविषयीं मत देण्याचीं साधनेंहि बहुधा नसतात. या भाषेमध्यें शब्दसौरस्याकडे अपूर्व लक्ष पोंचविल्यामुळें तिला विशेष गोडी आली आहे; ती गोडी भाषांतरामध्यें नाहींशी होते; आणि दुसरें असें आहे, कीं संस्कृतांत अपरिमित समास करावयास सांपडतात त्यामुळें त्या भाषेस जी अधिक मिष्टता[3] येते, तीच भाषांतरामध्यें ते समास निराळ्या जातीच्या भाषेंत करूं लागलें असतां नीरस व ओढून ताणून आणलेले असे होतात त्यामुळें, नाहींशी होते, संस्कृत काव्य अपूर्व आहे, व त्यांतील साहित्यसंबंध इंग्रजी काव्यांतील साहित्यसंबंधाहून निराळे आहेत, त्यामुळें इंग्रजी काव्याच्या सहाय्यानें त्या काव्यांतील रस चांगला ग्रहण करतां येत नाहीं. हिंदूंच्या कल्पना व स्फूर्ति विलक्षण आहेत, त्यामुळें इंग्रज लोकांना त्यांच्या वृत्तींत शिरवत नाहीं.

वि. ना. मंडलीक–हिंदुस्थानाचा इतिहास.

११

हा अपूर्व चमत्कार पाहून सर्व सभाजन भिंतीवरील चित्रासारखे टकमक पाहून तटस्थ झाले; व विस्मयोद्गार काढून ह्मणाले, काय ही अदृष्टपूर्व चमत्कृति ! असें अघटित कृत्य या मृत्युलोकीं कधीं घडलें नाहीं! कोणीं पाहिलें नाहीं ! व कोणीं एकिलेंही नाहीं जी श्रुति बारा वर्षें अभ्यास करून मनुष्यास प्राप्त होण्याची बहुधा मारामारच, तीच श्रुति यांचा सव्यें हस्त मस्तकावर पडल्याबरोबर मनुष्यवाचाविरहित ज्ञानशून्य पशूनें

---

१ माधुर्य २ पुष्कळ ३ गोडी. ४ आश्चर्यानें काढलेले उद्गार. ५ वेद. ६ उजवा.

सांग ह्मणावी ! असें कृत्य ईश्वरी अंशावांचून होईल काय ? आह्मी उपनिषद्भाग पढून कर्मठपणाच्या अभिमानानें बुडालों ! दुसऱ्यास ज्ञान शिकवून आह्मी अज्ञानावस्थेंतेंच राहिलों अशा प्रकारें पुष्कळ सज्जन मंडळी पश्चात्तापानें झडपली आणि ह्मणाली, अहो हे प्रत्यक्ष ईश्वराचे अवतार ! ह्यांना कोण शुद्ध करील ? ह्यांच्याच दर्शनानें पृथ्वीवरील सर्व पतित उद्धरतील. जशी गंगा परमपूज्य पवित्र तशा ह्या चारी मूर्ति पवित्र आहेत, धन्य यांचीं मातापितरें, धन्य यांचा वंश, धन्य यांची जन्मभूमि ! असें बोलून सर्व प्रतिष्ठानवासी ब्राह्मणांनीं ह्यांना साष्टांग नमस्कार केला.

ज्ञानेश्वर महाराजांचें चरित्र—बळवंत खंडोजी पारख.

१२

समानशील आणि समान व्यसन हीं ज्यांच्या ठिकाणीं असतील, त्यांना एकमेकांविषयीं प्रेम उत्पन्न व्हायचें आणि परस्पराशीं सख्य जडायचेंच, असा साधारणतः अनुभव आहे.त्या अनुभवाच्या अनुरूपनच बाबासाहेबांचें व त्या काळ्या गृहस्थाचें सख्य होतें. नानासाहेबासारख्या थोर घराण्याचा माणसावर आपल्यासारखाच दुर्धर प्रसंग यावा निदान आला आहे असें वाटवें त्याबद्दल त्याकाळ्या गृहस्थाला खेद झाला,आणि तो प्रसंग येऊन त्याची व आपली एकच अवस्था झाली हें पाहून त्यास किंचित् समदुःख समाधान झालें, परंतु ही समदुःख स्थिति फार वेळ टिकली नाहीं. नानासाहेबांच्या व आ-

१ सगळा. २ कर्मास्तच प्राधान्य देणें. ३ करपली.

पल्या स्थितींत, त्याचप्रमाणें आपल्या व नानासाहेबांच्या दुष्मानात किती अंतर होतें हें त्यास पक्केपणीं ठाऊक होतें. परंतु ही वेळ बोलण्याची नव्हे असें पक्कें मनांत वाटूनच काय, त्यानें इतका वेळाप्रमाणेंच आपल्या चेहऱ्यावर खेद युक्त हास्याची छाया राहूं दिली.

ह. ना. आपटे.

१३

काव्यरचनेस मांडी घालून बसल्यावर पंतांची लेखणी त्यांना प्रसंगीं अनावर होत असे ! पंत जाडे पंडित व स्मरणशक्तिचे मोठे धड असल्यामुळें त्यांना ज्या गोष्टी सहज लीलेनें साधत त्या व्युत्पत्तिहीन व संस्कारविहीन पुरुषाला श्रमसाध्य वाटतात ! तानाजी मालुसऱ्याला मोठमोठाले जड पदार्थ जसे फुलासारखे इकडून तिकडे टाकतां येत, किंवा नानाफडणवीसाला राज्यकारभारांतील लहान मोठी कामें जातीनें पाहतांना बुद्धिबळें खेळणाऱ्या खेळाडूंपेक्षां जास्त त्रास घ्यावा लागत नसे, त्याप्रमाणें आमच्या भाषादेवीच्या राज्यांतल्या या कसलेल्या मल्लाला यमकानुप्रासांचा चमत्कार किंवा अष्टोत्तरशत[3] रामायणांतील अद्भुत प्रकार हे नित्य पाठांत पडलेल्या कसरतीच्या सहज खेळासारखे परम सुकर होते. आक्षेपक आपल्या कृतीवरून ठरवितो कीं संस्कृतशब्दप्रचुर, रसालंकारमय, विविधवृत्तघटित व शब्दचमत्कारवती अशी पंतांची कविता कवित्वाचा सहजोद्रेक[7] नव्हे, व जेथें श्रमसाध्यता आली तेथें प्रसाद कोठला ? रसिकत्व कोठलें ? व ती कविता तरी कसची ?

ल. रा. पांगारकर.

---

१ नेटानें बसणें. २ कठीण. ३. एकशेंआठ ४ टीकाकार. ५ सामर्थ्य. ६ विपुल. ७ सहज निघालेली.

१४

वाटेनें जो प्रदेश दृष्टिगोचर झाला तो फारच सुंदर होता. भूपृष्ठ हरितंतृणाच्छादित असल्याकारणानें प्रकृतिसुभग दिसत होतें. क्षुद्र पर्वतराजिंही त्याचप्रमाणें अल्पवृक्षावृत असून दृग्विषयास भयानक न करितां मनोरम करीत होत्या. लहान लहान ओढे व नद्या एकंदर वनश्रीच्या शोभेस पुष्टि देत होत्या. जे प्रवाह जवळच होते ते आपल्या स्फटिकासारख्या स्वच्छ जलानें व मन्दाभिसरणाच्या मंजुल स्वरानें नेत्र व कर्ण यांस तोषवीत होते, व जे दुरून दृग्गोचर होत होते ते क्षितिजावर जणुं काय रौप्यरसाच्या रेषेसारखे भासत होते. अशा प्रकारें मार्ग क्रमीत सायंकाळच्या सुमारास आह्मीं लंडन शहराजवळ येऊन पोंचलों. हें शहर कितीही अवाढव्य असो; यातील लोकांच्या उद्योगाची पायरी कितीही उंच असो; यांतील सुखोत्पत्तीच्या योजना कितीही कल्पनातीत असोत; यांतील विविध संस्था कितीही प्रशंसनीय असोत; एवढें खचित आहे कीं त्याचें बाह्य स्वरूप प्रेक्षकास मोहून टाकीत नाहीं.

विलायतचा प्रवास--पावगी.

१५

ज्या भाषेंत मुकुंदराज, ज्ञानेश्वर, सूर्यज्योतिषी, एकनाथ, रामदास, तुकाराम, मोरोपंत, चिपळोणकर वगैरे प्रसादिक ग्रंथकारांनीं ग्रंथरचना केली ती शिष्ट भाषा महाराष्ट्रांतलि सर्व प्रांतातिल व जातींतील लोकास सारखीच मान्य व्हावी, यांत कांहीं आश्चर्य नाहीं. प्रांतिक बो-

१ हिरवें. २ सहज. ३ रांग, ४ हळू वाहणें.

ळणें प्रांतापुरतें, व जातिक बोलणें जातीपुरतें; परंतु ग्रांथिक बोलणें व लिहिणें सर्व महाराष्ट्राकरितां आहे. मराठ्यांना स्वभाषेचा इतका अभिमान जो वाटतो तो उगाच फुकाचा नाहीं. मराठी भाषेंतल्या शब्दप्राचुर्याची बरोबरी पृथ्वीवरील इतर कोणत्याही भाषेला करितां यावयाची नाहीं. तसेंच, कोणताही गूढ किंवा सूक्ष्म अर्थ नानातऱ्हांनीं यथेष्ट व्यक्त करण्याची तिची शक्ति अप्रतिम आहे. शिवाय अनेक थोर प्रासादिक ग्रंथकारांनीं तिला आपल्या उदात्त, गंभीर, ललित व रम्य विचारांचें निवेदन केलें असल्यामुळें, तिच्यावरील महाराष्ट्रीयांची भक्ति शुक्लेंदुवत् उत्तरोत्तर वर्धमान स्थितींत आहे.

ज्ञानेश्वरी--प्रस्तावना. वि. का. राजवाडे.

१६

इतिहास हा मनास उन्नति व प्रसन्नत्वही देणारा आहे. ह्मणजे त्याच्या निरंतर वाचनानें चित्त शांत व स्थिर रहातें, आणि थोर होतें. याचें कारण उघडच आहे. एक चतुर ग्रंथकाराचें असें वचन आहे कीं. 'इतिहास ह्मणजे या जगांत जे महापुरुष होऊन गेले त्यांचीं चरित्रें आहेत,' ह्मणजे अशा पुरुषांनीं जीं कृत्यें केलीं त्यांनींच इतिहास भरला आहे; तीं काढून निराळीं केलीं तर काय उरेल? अर्थात् कांहीं नाहीं. तेव्हां आजपर्यंत या जगतीस भूषणभूत जीं रत्नें निरनिराळ्या देशांत निपजलीं त्यांचा सहवास जर अक्षयीं घडेल, तर त्यापरता लाभ कोणता? सत्समागमाचा महिमा असाच

---

१ जातसिंबंधानें २ ग्रंथासंबंधी ३ विपुलता ४ शुक्लपक्षांतील चंद्राप्रमाणें.

आहे. आपल्या मराठी व संस्कृत कवींनीं या महिम्याविषयीं निरनिराळ्या कथानकांनीं व दृष्टांतांनीं पुष्कळ लिहिलें आहे. या दृष्टांतांपैकीं तुकारामादि मराठी कवींची फार आवडती जी लोहपरिसाची उपमा ती या ठिकाणीं फार सुंदर व समर्पक होय.

मुं. यु. पेपर. १९०५

१७

रंगरावाच्या स्वाभाविक बुद्धिरूप सुदर प्रवाहाला कितपत सुंदरपणा व खोली आहे व त्याचा तास गुरुशिक्षणरूप जलौघ मिळाल्यानें किती मोठा झाला आहे, हें सर्व पाहिलें पाहिजे. जसा जलप्रवाह जमिनींतलीं जलें घेऊन जातो—परंतु वनें घेऊन जात नाहीं. त्याचप्रमाणें बुद्धिरूप जलप्रवाह आजन्म गुरूकडून मिळालेल्या ज्ञानप्रवाहाला नेतो. गुरु जागचेजागींच रहातात, आणि म्हणूनच आम्ही रंगरावाच्या गुरूचें थोडक्यात इतिवृत्त सांगणार. कारण मनुष्याचा मोठेपणा, लहानपणा त्याच्या गुरूवर व शिक्षणावर अवलंबून असतो. प्रसिद्ध योद्धा शिकंदर याचा शरपणा, त्याचें धाडस, वगैरे आरिस्टाटलच्या शिक्षणाचें फळ होतें. तसेंच शिवाजी महाराजांचें शौर्य, त्यांचे ठायीं वसत असलेली उदार बुद्धि, मातृप्रेम स्वदेशप्रीति मुत्सद्दीपणा या सर्वांचें कारण, श्रीस्वामी समर्थ व दादोजी कोंडदेव यांनीं दिलेल्या शिक्षणाचें फळ होय.

सौ. काशीबाई कानिटकर—रंगराव,

१८

कवि हा कामरूपधारी पटाईत बहुरूपी आहे, वायूप्रमाणें तो सर्वगामी आहे, मनाप्रमाणें तो चंचल आहे; हवी ती वस्तु उत्पन्न

१ इंद्र. २ वाटेल तें रूप घेणारा.

-करणारा तो वस्ताद जादुगार आहे; कल्पनाशंकूच्या जिवावर कालो-धींत पाहिजे त्या दिशेस सुकाणूं लावण्यास न डगणारा तो जरठ झालेला एक तांडेल आहे; विश्वबीजाप्रमाणें त्याचे उद्गार अनंत व नित्य आहेत. कोणतीही वस्तु कितीही दूर असो, किंवा कितीही सूक्ष्म असो, त्यानें तिच्यावर आपली दुर्बिण किंवा सूक्ष्म दर्शक यंत्र लाविलें कीं त्याला ती सन्निध आणि स्थूल होऊन हवी तशी पाहतां येते, व दुसऱ्याना तिचें यथातथ्य आकलन होईल अशा तऱ्हेचें तिचें चित्र काढतां येतें. जर तुह्मांला पातालांतील व स्वर्गांतील वस्तुस्थिति पहावयाची इच्छा असेल तर मिल्टनचा किंवा कालिदासाचा हात घट्ट धरून ते नेतील तिकडे जाण्यास तयार व्हा! अनंत प्रकृतींच्या हृदयडोहात बुड्या मारून त्याच्या तळाशीं काय आहे हें जर तुह्माला पहावयाचें असेल तर, शेक्सपीअर किंवा भवभूति अशा जगत्प्रसिद्ध पानबुड्याच्या कमरेला मिठी मारा!

मुं. यु. पेपर. १९०३--४.

१९

हैदरअल्लीच्या नेहमींच्या वर्तनाप्रमाणेंच ह्यावेळींही त्याची +' वच-स्येकं मन्स्येकं ' अशीच वागणूक होती. कृत्रिम, कौटिल्य, आणि कापट्य ह्या दुर्गुणांचा केवळ मूर्तिमंत पुतळाच बनलेला हैदर बहादर बोललेल्या बोलास कोठून जागणार? ह्या लढाईत त्याची इतकी फटफजिती व इतकें नुकसान झालें असतांही बोललेल्या गोष्टीस हर-ताळ लावून त्यानें तहाच्या यादीस बत्ती दिली, आणि " स्वभाव-एवात्र तथातिरिच्यते। यथा प्रकृत्या मधुरं गवां पयः ॥ १ ॥ "

+ वचस्यन्यन्मनस्यन्यत् ' असें असावें.

ा वचनाप्रमाणें संवत्सरप्रतिपदेचे दिवशीं रात्रौ त्रिंबकराव मामा ोजन करून स्वस्थ बसले असतां, ह्या कपटपटूनें मामांच्या गोटा-र पट्टणाहून तोफांचा भडिमार केला ! ! हें पाहून त्रिंबकरावादि ूर्तित्रयानें श्रीरंगपट्टणचा किल्ला उजवा टाकून ह्मैसूरच्या महिषाचा ळी पाडण्याकरितां प्रचंड समरयज्ञ आरंभिला !

ब. त्र्यं. सहस्रबुद्धे—परशरामभाऊ पटवर्धनांचें चरित्र.

२०

शेक्सपीअर हा जरी महाकवि खरा तरी तो केवळ स्वर्गांतून ृत्युलोकावर उतरला, व त्यानें जें केलें तें अमानुष आहे, असें ानायाचें नाहीं. शेक्सपीअरनें आपल्या विलक्षण बुद्धिसामर्थ्यानें ा अचाट कल्पनाशक्तीनें मनुष्य मात्रावर जे उपकार करून ठेविले आहेत, त्याबद्दल त्याला कोणी हवा तितका करभार[1] देवो, त्यासाठीं आमचें कांहींएक ह्मणणें नाहीं; आमचें इतकेंच ह्मणणें आहे कीं, ोक्सपीअर बरोबर नाट्यकलेची परमावधि होऊन गेली असें सम-ून आतां तिची अधिक उन्नति करण्याचें काम सोडता कामा नये. 'कालोह्ययं निरवधिर्विपुलाच पृथ्वी " अशी स्थिति असल्यामुळें शे-क्सपिअरच्या तोडीचेचसे काय, पण त्याहून श्रेष्ठ कवि उत्पन्न हो-ण्याचा संभव आहे. यासाठीं ज्याच्या नशीबीं असेल त्यानें त्याच्या अलौकिक नाट्यरसाचें बुद्धिविकासक आणि शांतिप्रद पान तर यथे-च्छ करावेंच, पण जमल्यास त्याच्या गुणदोषांचें विवेचनही करावें; कारण त्यापासून अनेक फायदे आहेत. मागल्या कवींचे दोष दृष्टोत्प-तीस आल्यानें पुढल्या कवींना ते टाळणें सुलभ होतें हा तर गुणदोष-

---

१ खंडणी; ( मान )

विवेचनापासून होणारा एक फायदा आहेच; पण याहीपेक्षां विशेष महत्वाचा फायदा कोणता ह्मणाल तर असल्या विवेचनानें कवींचें खरें हृद्गत कळूं लागतें.

आगरकर–विकारविलसित.

२१

सत्यमेव जयेते. सत्याच्या किंवा सुविचाराच्या दृष्टिनें या इतक्या सुधारणा अत्यावशक होत. या प्रमुख सुधारणांच्या पोटांत दुसऱ्या पुष्कळ सुधारणांचा अंतर्भाव होतो. उदाहरणार्थ, जातिभेद नाहींसा होतांच सोंवळें ओवळें, विटाळ, भक्ष्याभक्ष्यविचार पेयापेयविचार वगैरे पुष्कळ गोष्टींचा निकाल लागेल. मूर्तिपूजेचें बंड मोडतांच शनिमंगळादि ग्रहांचें महात्म्य नाहींसें होईल; राहुकेतूंचा उपद्रव बंद होईल; मंत्रतंत्र, जपजाप्य, संध्यासंतर्पण, श्राद्धपक्ष इत्यादि सर्व जुनाट धर्मकृत्यें विलयास जातील. ईश्वराचेंच अस्तित्व संदेहात्मक झाल्यावर, भूतपिशाच्चाचें, हडळीडाखणी व इतर सर्व काल्पनिक अस्तित्वें सहजच अश्रद्धेय होतील; व अनुचित अशा किंवा भय उत्पन्न करणाऱ्या मिथ्या कल्पना, ह्मणजे स्वर्ग नरक वगैरे याही अनायासें विलुत्प होतील.

म. शि. गोळे.--हिंदुधर्म आणि सुधारणा,

२२

ज्ञानदेव, अगर तुकाराम ह्याच्या सारख्यांच्या कृतीपासून आपण जो एक महत्वाचा बोध घ्यावयाचा तो हा कीं, उद्योग फलाची सिद्धि नव्हे. ह्मणजे कोणताही इष्ट उद्योग आरंभिला असतां तत्क्षणींच

फळ प्राप्ती होणें अगर न होणें, हें लांबचें असून, आपल्या हातचें नाहीं. सदुद्योगाविषयीं होणारी प्रवृत्ति हितकारक आहे. परमेश्वरानें ज्याज्याविषयीं स्फूर्ति दिली तें तें करावयाचें, हाच विचार आपणांस समाधानवृत्ति प्राप्त करून देऊन परमेश्वराच्या आराधनेस उद्युक्त करीत असतो. ज्ञानेश्वर, तुकाराम यांनीं सर्व जन ब्रह्मरूप दिसावें असें ह्मटलें आहे. तुह्मा आह्मांला असें वाटणार आहे कीं, सर्वजन ब्रह्मरूप दिसणें हें आपणांला शक्य नाहीं असें आपल्याला वाटतें ह्याला कारण वास्तविक पाहतां आपणच आहों. आपल्या ठिकाणीं परमेश्वराची स्थिति आहे, ती न पाहतां दंभ, अभिमान, गर्व, असत्य इकडे आपलें सर्व लक्ष जातें. आपण आपल्या स्वतःकडे मात्र चांगल्या दृष्टीनें पाहतों. ह्मणजे दुसऱ्याचे दुर्गुण, व्यंगें पाहाण्याकडे आपलें सर्व लक्ष लागलेलें असतें,त्यांच्यात जो ब्रह्माचा भाग असतो त्याकडे आपण बिलकूल लक्ष देत नाहीं. आणि त्यामुळेंच आपणांस अवघे जन ब्रह्मरूप दिसत नाहीं.

न्या. मू. रानडे--धर्मपरव्याख्यानें.

२३

मध्यान्हाचा समय. सूर्याच्या प्रखर किरणाच्या माऱ्यापुढें हार खाऊन प्राणिमात्र, आपापल्यपारी, निवाऱ्याचे जागीं दडून बसले.जड सृष्टींतील पदार्थही उन्हानें सुस्त झाल्यासारखे दिसले. नेहमीं घरघर फिरणारा वारा तोही मंदावला आणि झाडाझुडपांचा आश्रय करून स्वस्थ बसला. तळ्यांसरोवरांतील पाणी अगदीं निश्चल झालें; इतकें कीं, त्यांत कांठांवरील तरुलतांचीं प्रतिबिंबें, किती वेळ तरी, आरशांतील चित्रांसारखीं स्पष्ट दिसत होतीं.

मुं. यु. पेपर. १९१०

२४

नारायणानें आईबापाचा निरोप घेतला आणि तो तडक निघाला. आपण हातीं घेतलेलें काम फार मोठें आहे, दृढनिश्चय व अविश्रांत उद्योग यांवांचून तें तडीस लागावयाचें नाहीं, हें तो जाणून होता. आजपर्यंत, फुलपाखरांप्रमाणें, आज हें अंगावर घे, उद्या त्याला हात घाल, परवां तिसऱ्याचे पाठी लाग, असें करण्यांत त्याचे दिवस गेले होते. कामाचा पिच्छा पुरवून तें पुरें करून दाखविण्यास लागणारी चिकाटी, दम आणि धिमेपणा त्याचे अंगीं आहे असें दिसून आलें नव्हतें. तरीही, त्यानें मनावर घेतल्यास, त्याचे हातून, अत्यंत श्रमाचीं, अत्यंत जबाबदारीचीं, अत्यंत कठीण कामेंही होतील अशी त्याच्या आईबापांस उमेद होती. ह्मणून त्यांनीं त्याला आतांच्या महत्त्वाच्या कामगिरीवर पाठविलें होतें.

मुं. यु. पेपर. १९१०

२५

कोणत्याही सार्वजनिक मताचें खंडन करण्यास उद्युक्त होणाऱ्या मनुष्यांच्या शिरावर सर्व प्रकारें मोठा बोजा असतो. अगोदर त्याचें ह्मणणें कोणी ऐकतच नाहीं. जर लोकांनीं त्याचें ह्मणणें ऐकून घेतलेंच तर ते मोठे भाग्यशाली व अलौकिक सामर्थ्याचे असले पाहिजेत. न्यायासनासमोर जाणाऱ्या पक्षकारांस फैसला[1] मिळण्यास जितकी अडचण पडेल, त्या पेक्षांही अधिक अडचण अशा माणसांस नुसत्या चौकशीच्या कामीं पडते. मोठ्या मुष्किलीनें चौकशीचा प्रसंग घड-

---

१ निकाल.

वून आणलाच तर इतर लोकांची जी वादाची प्रमाण–पद्धति, तिच्याहून अगदीं भिन्न अशा प्रमाण–पद्धतीच्या कचाट्यांत लोक त्यास धरितात. इतर सर्व कामांत पुराव्याचा भार अस्तिपक्षावर[1] घालणें योग्य समजतात. एखाद्या मनुष्यावर खुनाचा आरोप करून जे त्यास दोषी ठरवितात तो मनुष्य दोषी आहे असें शाबीद करण्याचा बोजा त्यांच्यावरच असतो. मी निरपराधी आहें, असें त्या आरोपीस प्रथमच सिद्ध करावें लागत नाहीं. एखाद्या सामान्य खटल्यांत या तक्रारी किंवा अटी योग्य आहेत,असें लोक मानतील परंतु प्रस्तुत प्रकरणीं या तक्रारी योग्य आहेत असें ते कधींही ह्मणणार नाहींत.

गो. वा. कानिटकर.

१ अमूक गोष्ट आहे असें ह्मणणारा.

---

## पद्यानुवाद.

### १

वाल्मीकि ऋषींनीं संस्कृतांत लिहिलेलें रामायण जर इतर कवींनीं मराठी भाषेंत रचलें तर त्यांत रसहानि होण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं. उदाहरणार्थ रेशमाच्या दोऱ्यांत ओंविलेला मोत्यांचा हार जर लागलाच कापसाच्या दोऱ्यांत ओंविला तर त्याच्या तेजांत कांहीं कमीपणा येईल काय !

'रामायणाचें स्वारस्य जें कांहीं संस्कृतांत आहे तें मराठींत नाहीं' असें कोणी अविवेकी ह्मणतात; परंतु सुज्ञांस हें मत पसंत नाहीं. कारण जो खरा रसज्ञ आहे त्याला गाईच्या दुधाची गोडी रत्नखचित सुवर्णाच्या वाटींत अगर पळसाच्या द्रोणांत सारखीच लागते.

वाल्मीकि आदिकरून कवींनीं रामचरित गाईलें आहे, ह्मणुन माझ्यासारख्या ( मोरोपंतासारख्या ) सामान्य कवीनें तें आनंदानें गाऊं नये काय ? गंगोदकांत शंकर इंद्र वगैरे देव स्नानादिविधि कारितात ह्मणून सामान्य प्राण्यांनीं तें वर्ज्य करावें असें कोण ह्मणेल !

२

' ही मराठी भाषा खास लुप्त व्हावयाची आहे; मग हिचें रक्षण करण्याची उगीच खटपट कां करितां ? असें जे कोणी ह्मणतात त्यांना असें विचारा कीं, ' काय हो आपली आई जर मरावयाला टेंकली तर तिला बरी करण्यास मुलान औषधोपचार करूं नये काय ? स्वमाता आणि स्वभाषा यांत भेद नाहीं. यांत दोघींची ही सेवा करणें हें आपणांस अवश्य आहे. फार काय पण मातेच्याहून ही भाषेची थोरवी जास्त आहे; कारण कीं माता एकवार जन्म मात्र देते, परंतु पुढील सर्व व्यवहार भाषेच्या साहाय्यानेंच होतात. एक वेळ आईवांचून सर्व जन्मही काढितां येईल; परंतु भाषेवांचून एक क्षणही जावयाचा नाहीं. आई आपलें रक्षण करिते असें ह्मणावें, तर तिचें सांगोपन बाल्यावस्थेपुरतेंच असतें, परंतु भाषा सर्व अवास्थांत रक्षण करण्यास सदोदीत तत्पर असते. अशाप्रकारें जी आपणांस सदैव उपयोगी पडते, तिला दैवशात् दुर्गति प्राप्त झाली असतां तिची जर आपण हयगय केली तर तें उचित होईल काय ? ह्मणून ज्या ज्या ग्रंथकारांस ह्या आपल्या मराठी भाषेचा अभिमान वाटत असेल त्यांनीं माझ्या प्रार्थनेकड नीट लक्ष द्यावें. जोंपर्यंत आपल्या देशीभाषेंत उत्तम ग्रंथाचीं अभिवृद्धि झाली नाहीं तोंपर्यंत लोकमतास योग्य वळण लागावयाचें नाहीं. जे आपल्या मातृभाषेचा आव्हेर करून परकी भाषेच्या खोट्या प्रेमाला भुलले आहेत त्यांना सावत्र आईचा तडाखा कसा आहे याचा चांगला अनुभव येऊं द्या. ( ह्मणजे मग ते शुद्धीवर येतील. )

३

जरी भाषा भिन्न झाली तरी अर्थ कांहीं बदलत नाहीं; आणि आपला जो कार्यभाग आहे तो अर्थाकडेच लक्ष दिल्यानें साधतो. संस्कृताचें खरें चीज मराठीमुळेंच होतें. नाहींतर त्यांतला गूढार्थ कितीकांना समजला असता ? जाऊंद्या हा वाद; ज्याप्रमाणें एकाद्या फळाच्या साली किंवा टरफलें टाकून देऊन आंतील मगज आपण घेतों त्याप्रमाणें विशिष्ट भाषेसंबंधीं वाद टाकून आपण तत्वाचें गृहण करावें. अर्थला जर धान्यकणाची उपमा दिली तर ज्या भार्षेत तो सांगितला आहे तिला त्याची साल ह्मणणें शोभेल. जे कोणी अभिमानानें ही वाटाघाट करीत असतील ते करोत, परंतु त्याच्यायोगानें अहं-

काराची मात्र वृद्धि होते, आणि मोक्षमार्गांत अडथळा येतो. कांहीं लोक ह्मणतात काय हो ! ही मराठी कीं काय ? हिचा तर चांगल्या माणसाच्या कानालाही विटाळ होऊं नये ! पण तिच्या योगानें एकंदर अर्थ किती झटकन् समजतो हें कुठें त्या मूर्खांस समजत आहे ? पहा ज्याप्रमाणें अनेकविधरत्नांनी भरलेली तिजोरी एखाद्या हतभाग्यास लाभली तरी तो ती लोखंड ह्मणून टाकून देतो; त्याप्रमाणें जड मूढ लोक पूर्ण ब्रह्मज्ञानानें भरलेल्या काव्यरत्नावलीचा ती केवळ मराठी म्हणून अव्हेर करितात. अंगणांत परीस सांपडला अगर रस्त्यांत चिंतामणि मिळाला, अथवा विहीरींत अत्यंत गुणकारी अशी उजवी वेल प्राप्त झाली तर ती घेण्यास जर कोणी कचरत नाहीं; मग मराठींत अनायासानें 'एकमेवाद्वितीयम्' हें तत्त्व कळून अनुभवासहित आत्मज्ञान सहज मिळत आहे तर त्याचा कांहो आव्हेर करावा ? मराठींत व्याकरण शिकण्याची खटपट केल्वाशिवाय सर्व शास्त्रें समजतात, हा सत्समागमाचा प्रभाव होय.

४

हे परमेश्वरा ! तुझें गुणवर्णन मराठींत करूं लागलों कीं तिचें सौंदर्य पाहून जींत तुजविषयींच्या ज्ञानाचें भांडार भरलेलें आहे अशा वेदवाणीसही मत्सर उत्पन्न होतो. देवा आधीं तुझें नामच स्वभावतः गोड आहे, आणि त्याच्यांत भाषामाधुर्याची भर पडल्यावर मग काय विचारतां ! त्याच्या श्रवणानें आणि कीर्तनानें प्रेमाचें भरतें येतें. गोकुळांतील गोपी काय वेदशास्त्र पढल्या होत्या ? परंतु त्यांची उत्कट भक्ति पाहून वेदवेत्ता साक्षात् तुझा मानस पुत्र जो ब्रह्मदेव त्यानेंही त्यांचे पायांची धूळ मस्तकावर धरिली. गजेंद्रास मोक्ष मिळाला, त्यानें कोटल्या हो शास्त्राचे अध्ययन केलें होतें ? ध्रुवानें अढळपद कसल्या हो विद्वत्तेवर मिळविलें ? कुब्जेनें रूपावलि समासचक्र घोकिलें होतें काय ? ज्ञानाभिमानानें ऋषि मोक्षास आंचवले; परंतु त्यांच्या बायकांनीं, अक्षर शत्रु असूनही, अनन्य भक्तीच्या जोरावर, अक्षय्य आनंद मिळविला. यावरून एकंदरींत भक्तीचा महिमा विशेष आहे ह्यांत तिळप्राय संशय नाहीं; , तुझ्या चकोररूपी भक्तांस तूं चंद्रासारखा आल्हादकारक आहेस, अथवा मयूररूपी भक्तांस तूं मेघासारखा सर्वत्र दिसून आनंद देतोस; ह्मणून हे परमेश्वरा ! तुझ्या प्राप्तीचें खरें साधन विशिष्ट भाषा नसून प्रेमाचा जिव्हाळा हें होय.

५

संस्कृतांत ज्यांनीं काव्यें केलीं ते मात्र खरे कवि, मग मराठी कविता करणारे खोटे कीं काय? सोन्याचीं फुलें केलीं तर त्यांत हीं नवीं आहेत तीं जुनीं आहेत असा भेद करितां येईल काय.? ( कारण सोनें नेहमीं सारखेंच असतें तसें कवित्वहि असतें ). कपिल गाईचें तेवढें दूध ह्मणावें मग इतर रंगाच्या गाईचें काय पाणी ह्मणावयाचें? रंग, रुचि, व माधुर्य हीं दोहोंत एकच नसतात काय? कोणी ह्मणतात संस्कृतभाषा देवापसून उत्पन्न झाली; मग मराठी कोणी चोरानें केली कीं काय? जाऊं द्या पण हीं अभिमानानें मूढ झालेल्या लोकांचीं बोलणीं! या वायफळ बडबडीशीं आपल्याला काय करावयाचें आहे. ज्या भाषेंत ईश्वराच्या गुणाचें वर्णन केलें आहे. तीच भाषा खरोखर पवित्र व सत्य होय— ती मग संस्कृत असो वा मराठी असो. ईश्वराजवळ भाषांविषयीं भेदबुद्धि नाहीं; त्यास संस्कृत व मराठी दोन्ही सारख्याच आहेत; ज्या भाषेंत ब्रह्मनिरूपण केलें आहे अशी कोणतीही भाषा त्यास आवडते. माझी मराठी भाषा अत्यंत उत्कृष्ट आहे; व ती ईश्वरविषयक ज्ञानानें ओतप्रोत भरलेली आहे; त्याचें खरें स्वारस्य संतजनांनाच कळेल; आणि त्यांच्याचसाठीं मी हा ग्रंथ रचिला आहे.

६

हिमालयपर्वतावर असणाऱ्या पुष्पयुक्त लतांनों ईश्वराचें नामस्मरण करा. आनंदानें भ्रमण करणाऱ्या गव्यांनों तुह्मी ईशस्तवन करा! हे मेघांनों तुह्मीही अंतःकरणापासून परमेश्वरास भजा आणि या कामांत सुवर्णासारखी चमकणारी तुमची मैत्रीण विद्युल्लता ही तुह्मांस मदत करील.

हे नगाधिपा परमेश्वराची आराधना करण्याचीं साधनें तुजजवळ आहेत; तेव्हां शांत अंतःकरणानें त्याचें तूं पूजन कर; तुजवर जे निरनिराळे ( कृष्ण, श्वेत ) चंदन आहेत त्यांची उटी देवास लाव व नंतर गंगाप्रवाहांतील पवित्र जलानें त्यावर तूं अभिषेक कर.

नंतर तुजवर असणाऱ्या हरिणांच्या नाभींमधील कस्तुरी घेऊन देवाच्या कपाळीं काळा ठिपका लाव; मग उत्तम सुवासिक फुलांची माळ करून ती त्याच्या गळ्यांत घाल; आणि कृष्णचंदनाचा धूप दाखवून तूं देवास संतुष्ट कर; मग मेघभार्या विद्युल्लता ही चमकून आपल्या तेजानें देवास आरती ओंवाळील.

७

उन्हाळ्यांत तुझें पाणी आटून जाऊन आज जें हें विस्तीर्ण पात्र दिसत आहे तें सुखून कोरडें ठणठणीत पडेल; मग या प्रवाहाच्या जागीं मोठमोठाल्या धोंड्याच्या रांगाशिवाय दुसरें कांहींच दिसणार नाहीं. त्यावेळीं तुझ्याजवळ एकही प्राणी येणार नाहीं हें पक्कें ध्यानांत ठेव. या तुझ्या वैभवाचा अंत समीप आला आहे, तर बा ओढ्या ! गर्व टाकून दे आणि माझ्या बोलण्यावर विश्वास ठेव.

सांप्रत, फुललेल्या लता तुला मोठ्या हर्षानें कुसुमांजलि अर्पण करीत आहेत; वायु तृणाच्या चवरीनें तुजवर चामर ढाळीत आहे; तुझ्या प्रवाहावर सूर्य किरण सोन्यासारखे शोभत आहेत. परंतु हे परपुष्टा ! हें सर्व वैभव क्षणभंगुर आहे; ह्मणून मोठ्या नम्रतेनं परोपकारकडे त्याचा विनियोग कर.

हल्लीं गर्वानें तूं इतका फुगला आहेस कीं तूं आपल्याला सागरच समजत आहेस, परंतु तीन महिन्यांनीं तूं अत्यंत क्षीण होऊन जाशील. मेघाच्या प्रसादानें तुला हें ऐश्वर्य प्राप्त झालें आहे; तर त्यांत तूं लीनतेनें वाग, सर्वांच्या उपयोगीं पड व कीर्ति संपादन कर.

८

हे कवितादेवि ! हर ! हर ! तूं किती तरी हतभागी आहेस ! काय तुझें हें फुटकें नशीब ! कीं या भूतलावरील नररत्न काळानें चोरून नेलें असतां आपले दुःखोद्गार पद्यरूपानें प्रगट करण्याचा दुर्धर प्रसंग तुजवर आला आहे ! ज्या इंग्रजी भाषेनें आपल्या विस्तारानें सर्व भूमंडळ व्यापिले आहे, व जी इतकी मानी स्वभावाची आहे कीं ती आपपर ओळखित नाहीं, तिला आपली पायधूळ झाडणारी दासी बनविणारे रानडेकुलावतंस एकटे माधवरावच होत. ( इंग्रजी भाषा त्यांच्याकडे पाणी भरीत होती. )

जिचा वर्ण ( सौंदर्य पक्षीं अक्षरें ) अलंकार, गण ( देवगण, पक्षीं वृत्तें ) रसिकपणा ( शृंगारादि ) इ. गुण पाहून प्रत्यक्ष देवांस सुद्धां मोह पडतो अशा संस्कृतभाषासुंदरीचें प्रेम ही या अद्वितीय नरश्रेष्ठानें संपादिलें होतें. त्यांच्या मनांत मराठी वाङ्मयाबद्दल प्रेम अखंड वास करीत होतें व त्यांनीं त्यास अत्यंत दुर्लभ असा मान मिळवून दिला ( एम. ए. च्या परीक्षेंत ) पश्चिमेकडील व पूर्वेकडील देशांतील तत्वज्ञान व कायदे त्यांच्या पुढें सदैव हात जोडून उभे असत.

कवि ह्मणतो ' मला असें वाटतें कीं इतके दिवस सर्वविद्या त्यांचे जिव्हाग्रीं मोठ्या सुखानें नांदत होत्या, परंतु हर ! हर ! तो त्यांचा आश्रय नाहींसा झाल्या-मुळें त्या आतां देशोधडीस लागल्या आहेत.

९

याप्रमाणें मद्रदेशच्या राजाची कन्या सावित्री हिनें आपल्या सासूसासऱ्यांची परवानगी घेतली. तिची शरीरयष्टी फार नाजूक होती. तिचें पातिव्रत्य सर्व लोकांत गाजत होतें. व्रतेंवैकल्यें नियम उपवास इ. धर्मकृत्यें करून ती इतकी पवित्र झाली होती कीं तिच्या योगानें सर्व पृथ्वीच धन्य झाली. यमधर्म-सही संतुष्टकरून त्याचा कृपाप्रसाद मिळविण्यास ती योग्य झाली होती. आ-पल्या आवडत्या पतीला मृत्यूच्या जबड्यांतून सोडविण्याचें तिच्या अंगीं सामर्थ्य होतें, ह्मणून ती त्याजबरोबर वनांत जाण्यास निघाली. ती आपल्या पतीस शोभणारी बायको होती. प्रसंग पडल्यास पतीचे प्राण रक्षण्यासाठीं ती साध्वी आपल्या जिवावर पाणी सोडण्यास अथवा प्रत्यक्ष अग्नींतही उडी टाकण्यास त-यार होती. त्यावेळीं आपल्या पतीबरोबर जरी वनशोभा पहाण्याच्या मिषानें ती निघाली होती तरी अंतर्यामीं काळजीनें जें काहूर मांडिलें होतें त्यामुळें ती अ-स्वस्थ व म्लान दिसत होती. परंतु धीर न सोडतां प्रत्यक्ष काळासही तोंड दे-ण्यास तिनें कंबर बांधिली. याकरितां आपल्या पतीच्या मागोमाग ती चालली व त्याचा वियोग एक क्षणभर ही तिला सहन होईनासा झाला. मार्गानें जात असतां एकामागून एक जे नानातऱ्हेचे वृक्ष लागले त्यांपैकीं हा फळांनीं लवलेला वृक्ष कोण ? ह्या सुंदर पुष्पित वृक्षास काय ह्मणतात, ह्या वृक्षाभोंवतीं गच्च पसर-लेल्यालता वेलींची नांवें काय ? हे झुपके व हीं झुडपें कसलीं आहेत ! असे निरनिराळे प्रश्न करीत करीत व हातास येणारीं फळें व पुष्पें वेंचीत वेंचीत आणि अरण्यांतील पक्ष्यांचें सुस्वर गायन ऐकत ती वनाच्या मध्यभागीं येऊन पोहोंचली व तेथें एका झाडाखाली बसली.

१०

खरोखर तुझें भव्य शरीर व तीव्र गति पाहून दिग्गज मनांत खजिल होऊन आपल्या माना खालीं घालतील.

निरनिराळ्या रंगांनीं चमकणारें नील इंद्रधनुष्य जें तूं धारण केलें आहेस त्यानें तुझ्या देहास अवर्णनीय शोभा आली आहे.

हे घना त्याच्या योगानें पूर्वी वृंदावनांत श्रीकृष्ण मोराच्या पिसांचा मुकुट घालून जसा सुंदर दिसला तसा तूंही दिसशील.

शेतकऱ्यांच्या बायका जरी साध्याभोळ्या आहेत तरी तुला त्या सप्रेम दृष्टीनें जणूं काय गिळूनच टाकितील.

त्यांच्या काबाडकष्टांचें चीज करणें सर्वस्वी तुझ्या हातीं आहे म्हणून हे मेघा नांगरल्यामुळें ज्यांचा सुगंध सुटला आहे अशा त्यांच्या भूप्रदेशावर [ माळांवर ] तूं क्षणभर वृष्टि कर.

ज्या अमरकंटक पर्वतावरील वणवा तूं आपल्या जलवृष्टीनें विझविलास तो पर्वत तुला आपल्या मस्तकावर धरील.

सामान्य मनुष्य सुद्धां उपकर्त्या पुरुषास आपली कृतज्ञता दर्शवितो. मग तो थोरमनाचा ( पक्षीं अत्युच्च ) पर्वत तुझे उपकार विसरेल काय !

त्या आम्रकंटक पर्वताच्या सर्व पृष्ठभागावरील आंब्यांचीं झाडें पिकलेल्या आम्र्यांनीं लवलीं आहेत; व तुझ्या स्पर्शामुळें त्याचीं शिखरें तुझ्यासारखींच श्याम-वर्ण झालीं आहेत.

११

जन्मादि रहित जो रामचंद्र हा राज्य करीत असतां सर्व दरिद्री लोक श्रीमंत झाले; रोगी निरोगी झाले; अज्ञानी लोक ज्ञानसंपन्न झाले; गाई घागरभर दूध देत असत; पृथ्वीवर धान्य व रस यांची विपुलता झाली; व शरयूच्याकाठीं नेहमीं यज्ञयाग होत असल्यामुळें त्रैलोक्यास आनंद होत असे.

वृक्षवेली, फुलांनीं व उत्तम आणि मधुर अशा फळांनीं भरलेल्या असल्यामुळें फार मनोहर दिसत. आईबापांना आपल्या देखत आपल्या मुलाबाळांचा मृत्यु पहाण्याचा प्रसंग कधीं येत नसे; वंध्यांना पुष्कळ संतती झाली; चारी वर्णांतील लोक आपापले धर्म पाळण्यांत दक्ष असत; व ते रामाच्या अमृततुल्य कथा नेहमीं आनंदानें ऐकण्यांत मग्न असत.

रामराज्यांत सर्व लोक पुण्यशील असल्यामुळें पातक देशोधडीस लागलें; काबाडकष्ट करण्याचें कोणालाच कारण पडलें नाहीं; सर्वच लोक सुखी असल्या-

मुळें आतां आपण रहावें तरी कुठें अशी चिंतेसच पंचाईत पडली; संकटाची तर नांगीच मोडून गेली; व भीतीनें तर आपलें तोंड काळें केलें. अयोध्येंत रामचंद्र आपल्या आत्पबंधूसह जेव्हां राज्य करीत होता त्या वेळीं लोकांची अशी स्पृहणीय स्थिति होती.

१२

जिच्यांत उत्तमवर्ण व पद्यांचे चरण आहेत ( पक्षीं जिच्या पायांत सोन्याचे पैंजण आहेत ), जी श्रोत्यांचें मन उत्तमप्रकारें रिझविते ( पक्षीं जिचा स्वर कर्ण-मधुर आहे ) व जी त्यांस आवडते, जींत अत्यंत कोमल स्वर आहेत ( पक्षीं जी नाजूक आहे ); जिच्यांत उत्तम काव्यगुण असून जी उत्तम वृत्तांत रचली आहे; ( पक्षीं जी अनेक गुणानीं युक्त आहे ) जी सुंदर आहे, जिच्यांत गौडी वगैरे उत्तम काव्य रीति असून नीति सांगितली आहे ( पक्षीं जी नीति-मान व उत्तम चालीरीतींची आहे ) जिच्यांतून शृंगारादि नऊ रस पाझरत आहेत ( पक्षीं जी नवरसांत कुशल आहे ) अशी 'संमोहलहरी' नांवाची ( पक्षीं भुलविणारी ) उत्तम कवीनें रचेलली ( पक्षीं सद्गुणी गृहस्थाची मुलगी कविता मजकडे त्वरेनें आली आहे.

हे सत्कवीनें रचलेल्या 'संमोहलहरी' तूं कविजनांच्या मनाला अल्हाद देणारी आहेस. तुझ्या दर्शनानें माझें मन आनंद सागरांत मग्न होऊन गेलें आहे; व मजसारख्या गरिबाच्या घरीं तूं आपली पायधूळ झाडलीस हें पाहून मला अत्यानंद झाला आहे.

सोन्यामोत्यांनीं भरलेला आपल्या पित्याचा उत्तम राजावाडा टाकून आमची पर्णकुटी तुला आवडली तरी कशी ? ह्याचें मला मोठें आश्चर्य वाटतें. हे कल्या-णदायिनी या आमच्या वनांतील मधुर बकुल आणि पुष्प व सुगंधयुक्त सुंदर लतागृहें तुला सुखकारक होवोत !

१३

जीं सुवर्णकमलें स्वर्गांतील गंगेंत उगवतात व ज्यांचे देंठ, बिसतंतु आणि कंद मऊ असतात त्यांवर आम्ही उपजीविका करितों; म्हणून हे राजकन्ये ! आमचे देह सुवर्णमय आहेत. कारणाच्या ठिकाणीं असलेले गुण कार्यामध्यें अवश्य येतातच.

'हे नळ राजा तुझा यशोमयहंस मानससरोवरापर्यंत क्रीडा करीत येतो तो खुशाल येवो; परंतु " मानससरोवरावरील हंस सुवर्णकांति " असतात अशी जी आमची कुलाची कीर्ति आहे ती तो खोटी पाडतो ( कारण यशोमय हंस आपल्या शुभ्रवर्णानें आह्मांसही शुभ्रत्व आणितो ) ह्मणून त्याला आंवरून धर ' अशी तक्रार करण्याकरितां मी पृथ्वीवर आलों आहे. (नळाची कीर्ति मानस सरोवरापर्यंत पोहचली आहे हें तात्पर्य. )

या नरश्रेष्ठ नळाच्या असंख्य गुणांस लुब्ध होऊन त्याचेच जवळ मी चाकरीस राहिलों. या चतुर पुरुषास पाहून कोणास आनंद होणार नाहीं ! व त्यास उत्पन्न करणाऱ्या ब्रह्मदेवाच्याही प्रभुत्वाच्या वैभवाचे गुणानुवाद कोण गाणार नाहीं !

नळ एकटाच लिहीत वाचीत बसला असला कीं मी सुवर्णकांति असल्यामुळें मला जवळ येऊं देतो; आणि ह्मणूनच त्यानें मला आपला मित्र असें समजून माझ्या कानांत आपलें हृग्दत सांगितलें.

पूर्वी पासूनच नळासंबंधीं गोष्टी तिला लोण्याच्या गोळ्या प्रमाणें प्रिय होत्या; परंतु लोण्याची खरी रुचि हंसोदयानंतर ( सूर्योदयानंतर ) तें विरघळूं लागल्यावर जशी कळते त्याप्रमाणेंच नळाच्या गोष्टींची खरी खुमास तिला हंसोदयानंतर ( हंस आल्यावर ) कळूं लागली व मग ती त्याचें भाषण मोठ्या, उत्कटेनें ऐकूं लागली.

१४

लक्ष्मण वर सांगितल्याप्रमाणें भाषण करून रंणांगणांत असलेल्या कुशास बोलला कीं ' बाळा आतां दुराग्रह टाकून दे आणि मला शरण ये; व माझ्या धनुष्याच्या दोरीपासून माझे बाण जोंपर्यंत सुटले नाहीत तों पहिल्या युद्धांत धरलेले सर्व योद्धे सोडून दे '

वरील दर्पोक्ति ऐकून कुशानें असें उत्तर दिलें कीं ' तुह्मी जरी आपल्या पराक्रमच्या लांब लांब बाता सांगतां तरी तुमचें सर्व इंगित मला माहित आहे. जेव्हां रावणानें तुमच्यावर शक्ति सोडली त्यावेळीं तुह्मी फळ्यासारखे निश्चेष्ट पडला होतां. ( तुम्हांला तिचा प्रतिकार करवला नाहीं. )

परंतु जेव्हां मारुतीनें द्रोणागिरिपर्वत उचलून आणिला व जेव्हां त्यावरील औषधींचा रस तुमच्या तोंडांत गेला तेव्हां तुह्मी सुदैवानें शुद्धीवर आलांत.

नाशीक क्षत्री असताना तुह्मी शूर्पणखेचें नाक व कान कापून तिला विद्रूप केलीत या गोष्टींनी आपला लौकिक न वाढतां उलट दुर्लौकिक मात्र पसरला.'

हें मर्मभेदक भाषण ऐकून लक्ष्मणास फारच संताप आला, व त्यानें आपलें धनुष्य सज्ज करून एक प्रखर बाण सोडला. त्या बाणाचा वेग इतका होता कीं त्याच्या कडकडाटानें सर्व दिशा गजबजून गेल्या व त्यापासून दुसरे अगणित बाण पृथ्वीवर उत्पन्न झाले.

१५

तुकोबा ह्मणतात ' मला या लोकांचें नवल वाटते कीं आत्महिताची गोष्ट त्याच्या स्वप्नींही येत नाहीं ! काय हा जबरदस्त यांचा ताठा ! पण अंतकाळीं यांना कोण उपयोगी पडणार आहे ? काय समजून हे एवढे निष्काळजी होऊन राहिले आहेत ? यमाच्या बोलावण्यास काय हे उत्तर देणार आहेत ! आपणांस हे अमरच समजत आहेत कीं काय ? यांना एवढी भूल कसली पडली आहे कोण जाणे ? याना ताळ्यावर आणण्यास आह्मी तरी काय करावें बा ? आह्मास कोण विचारतो ? पण याना कसली बाधा आली आहे हें तरी आह्मास काय समजणार ? संसारातून मुक्तता करून घेण्यास हे ईश्वरास काहो भजत नाहीत ? नामस्मरण करण्यास यांचे गांठचे दोन चव्वल खर्चतात काय ? हे त्याच्या कसें ध्यानांत येत नाहीं हरि जाणे !' तुकाराम ह्मणतात हे चौऱ्याशीच्या फेऱ्यांत कांहो पडतात ? हे परमेश्वरास काहो विसरले ?

१६

ईश्वर हा त्रिगुणातीत आहे असें जें जाणणे त्यास ज्ञान ह्मणावें; या व्यतिरिक्त सर्व अज्ञान आहे. उदरंभरणार्थ लोक निरनिराळ्या विद्या शिकतात त्यांस ज्ञानी असे ह्मणण्याचा परिपाठ आहे खरा: परंतु त्या विद्यांपासून खरें आत्महित होत नाहीं. ज्याच्या योगानें त्या एका अद्वितीय परमेश्वराची ओळख पटते त्यासच ज्ञान असें ह्मणावें; व तेंच ज्ञान उपयोगी पडेल; इतर ज्ञान अगदीं निष्फळ असून केवळ चरितार्थोपयोगी होय. ह्मणून पोटभरावयाची विद्या ही सद्विद्या नाही, तर जिच्यायोगानें तत्काल सर्वव्यापी ब्रह्माची प्राप्ति होते तिलाच सद्विद्या असें ह्मणावें.

अशा खऱ्या ज्ञानाच्या योगानें प्राणी जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सुटतो; या शिवाय भलतेंसेच बोलणें हितावह नाहीं. असें वायफळ जर बोलावयाचें असेल

तर वेदशास्त्र व पुराण यांची काय किंमत राहिली ? संसारबंधनांतून मुक्त होण्यास प्रथमतः मनुष्याच्या हातीं हें ज्ञानशस्त्र आलें पाहिजे, तें प्राप्त झाल्यावर मग मुक्तीस वेळ तो काय ? आत्मानात्म विचार न समजणें ह्यास अज्ञान ह्मणावें; तो जाणणें हें ज्ञान होय; परंतु या ज्ञान व अज्ञानाच्या पलीकडे जें विज्ञान तेंच आत्मस्वरूप होय.

## १७

श्रीकृष्ण अर्जुनास ह्मणाले 'बा अर्जुना! हे घोडे फार थकून गेले आहेत. व ते फार तान्हेलेलेही दिसतात तेव्हां यांना पाणी पाजण्याची कांहीं युक्ति कर' त्यावर अर्जुनानें उत्तर दिलें ( 'देवा ! ) मी वारुणास्त्राचा जप करून येथल्या येथें रणांगणातच त्यांना पाण्याची सोय करितों व ज्याप्रमाणें चवताळलेल्या हत्तींचें महात निवारण करितात त्याप्रमाणें एकीकडे या योद्ध्यांचें ही निवारण करितों. ( त्याप्रमाणें ) हताश झालेल्या योद्ध्यांचे निवारण करून अर्जुनानें विहीर तयार केली. नंतर स्वतः श्रीकृष्णानीं त्या घोड्यांचें जोखड सोडिलें.

( मग ) त्यांस पाणी पाजून त्या चतुर कृष्णानें आपल्या दोन स्वच्छ हातांनीं त्यांच्या पाठी थुतल्या; हा विलक्षणप्रकार पाहून सर्व योद्धे कौतुकानें ह्मणूं लागले "कायहो या अर्जुनाचें सामर्थ्य ! "

( नतर ) दों दों रणनगाऱ्यांचा आवाज सुरू होऊन युद्धास प्रारंभ झाला. सैन्याच्या हालचालीनें उडालेली धूळ इतकी उंच गेली कीं तिनें सर्व आकाश व्यापून गेलें, दाही दिशा धुंद झाल्या व सूर्यही निस्तेज झाला. त्यावेळीं शत्रूकडील लोक ह्मणूं लागले कीं 'आतां अर्जुन रथाखाली उतरला आहे व संकटांत आहे तोंच त्यास मारून टाका; एकदा तो युद्धास सिद्ध झाला कीं साक्षात् यमाच्याही पाशाचें त्याजपुढें कांहीं चालावयाचें नाहीं.' ( इतक्यांत ) श्रीकृष्ण ह्मणाले ' हे अर्जुना! बघ हा सूर्य व हा जयद्रथः पहातोस काय ? धर नेम.' अर्जुन ह्मणाला ' हा धरला नेम.' मग श्रीकृष्णांनीं 'मार' असें सांगितल्याबरोबर अर्जुनानें जो अर्ध चंद्राकृति बाण सोडला त्यानें जयद्रथाचें मस्तक उडून गेलें.

## १८

निंदकाची जीभ मनावर बसलेले पुष्कळ वर्षांचे पापांचे जाड थर असे खरवडून काढते कीं तसे पुन्हा प्रयत्नानें ही मनाला सांचवितां येणार नाहींत. तसेंच

ती मोठ्या कौतुकानें पराहित करावयास निरपेक्ष बुद्धीनें आह्मांला उत्तेजन देते. ह्मणून हे निंदका साधूनां प्रिय अशी तुझी ही जीभ चिरायु होवो !

लोक नको नको ह्मणत असतां त्यांच्या पातकांचें ओझें जे आपल्या डोक्यावर घेतात; हा लहान तो मोठा अशी भेदबुद्धी ज्यांच्याजवळ वास करित नाहीं; मोठ्या परिश्रमानें मिळविलेलें आपलें पुण्य वेंचतांना ज्यांस बिलकूल दिक्कत वाटत नाहीं; अशा रीतीनें केवळ लोककल्याणासाठीं ज्यांचा जन्म आहे, व अशी ज्यांची परोपकारबुद्धि आहे, व जे साधूंचे मित्र आहेत; अशा निंदकांची निंदा करणें तुह्मांस शोभतें काय ? हे कविजनहो ! हा आपला मार्ग अप्रशस्त आहे.

आह्मां रामभक्तांना परमेश्वराची स्तुति मात्र आवडते; स्वतःच्या स्तुतीची तर आह्मी मुळींच पर्वा करीत नाहीं; असे असतां हे निंदका जर तूं जिच्यापासून पापाचा क्षय होतो व पुण्याची जोड होते अशी निंदा आमाची केलीस तर त्याबद्दल आह्मांस खेद न वाटतां उलट आनंदच होईल; परंतु ' निंदकांस स्वर्गलाभ न घडतां अधोगति मिळते ' हें वेदवचन पाहून मात्र आह्मांस अत्यंत दुःख होतें

१९

जो अशा पूज्य ऋषिवृंदांत शोभत होता, जो सर्वविद्वानांत श्रेष्ठ होता, ज्याचें अंतःकरण पवित्र होतें, जो जगप्रसिद्ध होता, ज्याचा प्रभाव फार मोठा होता, जो सिद्धाश्रमात आनंदानें कालक्रमणा करी, ज्याचा तप प्रभाव सूर्यासारखा कडकडीत होता मात्र सूर्याच्या ठिकाणी असणारें उदयास्ताचें वैगुण्य त्यांत नव्हतें; कलांचें निवासस्थान असल्यामुळें आनंददायक अशा त्याला चंद्राची उपमा देतां आली असती परंतु चंद्राचे वृद्धिक्षय त्याचे ठिकाणीं नसून त्याचें तेज नित्य वाढणारें होतें. सामर्थ्यांत तो इंद्राच्या बरोबरीचा, परंतु इंद्राप्रमाणें परस्त्रीगमनाचे पातकानें मात्र तो पतित झाला नव्हता; प्रतिसृष्टि निर्माण केल्यामुळें तो ब्रम्हदेवाची योग्यता पावला, परतु त्याच्याप्रमाणें त्यानें स्वकन्येचा अभिलाष मात्र केला नाहीं; अशाप्रकारें ज्याचे वर्णन केलें आहे अशा अत्यंत शुचिर्भूत, पुण्यशील, सीतास्वयंवराचें कौतूक पहाण्यास आलेल्या विश्वामित्र ऋषीला सकलगुणालंकरणमंडित विदेहदेशाचा राजा जो जनक त्यानें साष्टांग नमस्कार घातला.

२०

मी आपल्या आयुष्याचा मार्ग क्रमीत असतां यौवनारण्यांत येऊन दाखल झालों; तेव्हां मला मदमत्सररूपी, भुकेनें चवताळलेल्या व खादाड अशा क्रूर जनावरांनीं पछाडलें. त्यांनीं पाठलाग केल्यामुळें जो मी धांऊं लागलों तों विषयरूपी घाटावर येऊन थडकलों. त्या ठिकाणीं तर कामक्रोधादि वाघोबांची गर्दी पाहून मी गर्भगळीत होऊन गेलों. नंतर स्वधर्मपथानें चालूं लागलों तों याठिकाणीं कामरूपी चोरानें मला जखडून टाकिलें; व थांब थांब ह्मणून त्यानें इतकें आडविलें कीं शेवटीं हे देवा तुझ्या भेटीस मी मुकलों. क्षणभर डोळे उघडून पाहूं लागलों तों मायामोहरूपी सर्प माझ्या नरडीचा घोंट घेत आहे असें आढळलें त्यानें शेवटीं डांसा तोडलाच आणि त्यायोगानें मला अत्यंत विषबाधा होत आहे. शेवटला झटका आला नाहीं तों देवा धावून ये आणि कांहीं उपाय कर. ' माझा वाली विठ्ठल आहे ' असा नामदेव मोठ्यानें धांवा करीत आहे.

२१

आत्मसंयमन, सद्वर्तन, सहनशलिता, परोपकारबुद्धि, मर्मज्ञता, सुविचार, दयालुत्व वगैरे गुण ज्यांच्या अंगीं पूर्णपणें बाणलेले असतात त्यांनाच श्रोते ही संज्ञा योग्य आहे. ग्रंथातील रहस्य जाणण्याचें सामर्थ्य त्यांचेच अंगीं असतें व त्यांना तें कळलें कीं त्याचा ठसा त्यांच्या मनावर एकाद्या ताम्रपटाप्रमाणें अगर दगडावरील कोरलेल्या चित्राप्रमाणें अथवा घटिकायंत्राच्या छिद्राप्रमाणें कायमचा असतो; बाकी अभिषेकपात्रांत कितीही पाणी घातलें तरी कांहीं वेळानें तें गळून कोरडें ठणठणीत पडतें; अथवा पावसाचा थेंब कमळाच्या पानावर पडला न पडला तोंच तो खालीं पडून जातो; किंवा बुर्गसांत दाभण भोंसकला आणि लागलाच काढला तर छिद्र पडलें होतें किंवा नाहीं हें जसें समजत नाहीं; त्याप्रमाणें श्रोते या संज्ञेस जे अपात्र असतात त्यांची स्थिति असते. त्यांच्यांत रसिकताच नसते. भोंपळा पाण्यांत हातानें दाबून धरावा तोंपर्यंतच तो तेथें रहातो व हात सोडतांच तो वर उसळून येतो, त्याप्रमाणे ते जरीं कथाप्रसंगीं आत्मसंयमन करितात तरी कथा संपतांच त्यांचें मन पुन्हां उच्छृंखल होतें. ( याच्या उलट ) स्वाती नक्षत्रांत शिंपल्यांत पावसाचा एक थेंब जरी पडला तरी त्याचें मोती बनतें; किंवा पाण्यावर एक तेलाचा बिंदु टाकिला कीं तो लगलाच सर्वत्र पसरतो, त्याप्रमाणें

सच्छ्रोत्यांच्या कानांत एक शब्द पडला तरी त्याचा अर्थ, गर्भाप्रमाणें वाढीस लागतो व समुद्रातून लक्ष्मी उत्पन्न झाली त्याप्रमाणे क्षणोक्षणीं त्यांतून त्यांस बोध मिळतो. अशाप्रकारें ज्यांचें वर्णन केलें आहे अशा सच्छ्रोत्यांस हा ग्रंथ सादर केला आहे अयोग्य जे असच्छ्रोते आहेत त्यांच्यासाठीं हा मुळींच केलेला नाहीं.

२२

हे देवा! तुझ्या गुणांचें यथार्थ वर्णन करण्यास त्रैलोक्यांत ही कोणी समर्थ नाहीं असें पाहून 'स्तवार्थ तुझिया तुझ्यागम कर्मा कर्धा जन्मती' असेंच ह्मणण्याची पाळी येते. शेष आपल्या हजार तोंडांच्या घमेंडीवर तुझें गुणवर्णन करण्यास गेला परंतु व्यर्थ श्रमी होऊन त्याच्या जिव्हा मात्र दुखंड होऊन गेल्या. हे देवा तूं चर्मचक्षूंस दिसत नाहींस, तूं अचिंत्य आहेस, तुझा पार व अंतही लागत नाहीं, तूं त्रिगुणांच्या पलीकडे आहेस, तूं सत्य व ज्ञानमय आहेस. असें आहे तरी तूं आपल्या लीलेनें रामकृष्णादि अवतार धारण करितोस; आणि ज्या ज्या रूपीं तुझ्या भक्तांचा भाव जडतो तें तें रूप तूं घेऊन त्याचें कोड पुरवितोस. तुकाराम ह्मणतात देवा! तुझ्या कृपाप्रसादाशिवाय अन्य उपायांनीं तुझें दर्शन आह्मांस घडणें नाहीं.

वृक्षबीजन्यायांत ज्या प्रमाणें आधीं बीज कीं आधीं वृक्ष याचा निर्णय करितां येत नाहीं, त्याप्रमाणेंच आधीं देव कीं आधीं भक्त हें सांगतां येणार नाहीं. दोन्ही ही परस्परांत अंतर्भूत आहेत. अथवा देव भक्तांच्या ऐक्यास जलतरंगाचा दृष्टांत देतां येईल; किंवा बिंबप्रतिबिंब भाव देव भक्तांमध्यें आहे असें ह्मटलें तरी चालेल. कारण तुकाराम ह्मणतात बिंब अदृश्य झालें कीं त्याचें प्रतिबिंबही त्याच्यांतच लीन होतें.

२३

नंतर पांचवा ऋतु जो पावसाळा तो आल्यावर पश्चिम दिशेकडून झंझावात सुटून आकाशांत ढगांवर ढगें येऊं लागलीं. सर्वभूतलावरील पाण्यानें भरलेला असा मेघरूपी व्याध आकाशांत येऊन मृगाचा पाठलाग करण्यासाठीं आकाशभर इकडे तिकडे धावूं लागला. ( पक्षीं-मृगनक्षत्रापाठीमागून आकाश मेघांनीं भरून गेलें ) हातांत इंद्रधनुष्य घेऊन मृगी व मृग यांच्या पाठीवर मोठ्या वेगानें धावत जाऊन मेघव्याध जलरूपी बाणांची त्यांच्यावर वृष्टी करीत आहे. ( पक्षीं—रोहिणी व मृग

नक्षत्र लागल्यावर आकाशांत इंद्रधनुष्य दिसतें व पजन्याचा सपाटा सुरू होतो. ) सूर्य किरणाचा समूह हाच कोणी मृगांचा कळप तो भीतीनें व्याकूळ होऊन अगदीं निस्तेज झाला व अभ्रामागें जाऊन लपूं लागला ( पक्षीं. सूर्य अभ्राच्छादित असल्यामुळें निष्प्रभ झाला. ) अथवा वसुधातल हीच कोणी साळुंका ( शिवलिंग ज्यांत बसविलेलें असतें ती बैठक. ) व तिच्यावरील पर्वतसमूह हेंच शिवलिंग आणि त्या शिवलिंगावर आकाशरूपी अभिषेकपात्रानें इंद्रानें अभिषेक आरंभिला आहे असें रूपक केलें तरी शोभेल. ( इंद्र हा पर्जन्याधिपति आहे या गोष्टीस अनुलक्षून हें रूपक केलेलें आहे ). मोर, चातक, कवुतरें, बेडूक आपल्या आनंद-कल्होळानें जणूंकाय मेघ हा सर्व जगाचा पोशिंदा आहे असें सर्वास विदित करूं लागले. विजांचा कडकडाट व मेघांचा गडगडाट सुरू झाला आणि गंगादि नद्यांचीं पात्रें दुथडी भरून वाहूं लागलीं. अनेक तरुलतापल्लवांनीं युक्त अशी पृथ्वी जणूं हिरवा शालूच नेसली आहे कीं काय असें वाटूं लागले; आणि लोक-रक्षणार्थ पृथ्वीवर फळफळावळ भाजीपाला यांची रेलचेल उडून गेली.

## २४

आहो असें पहा कीं दिवस संपल्यावर रात्रीची पाळी उरते व ज्याप्रमाणें दिवस आणि रात्र या दोहोंशिवाय तिसरा प्रकार असणें शक्य नाहीं, त्याप्रमाणें जेथें ज्ञान नाहीं तें सर्व अज्ञानच आहे; तथापि त्याचीं थोडीबहुत लक्षणें सांगतों. आपली प्रतिष्ठा वाढावी ह्मणून आपणांस लोक मान केव्हां देतील याची जो वाट पहात बसलेला असतो व कोणी मोठेपणा दिला असतां ज्यास समाधान होतें; पर्वताचीं शिखरें जशीं अत्युच्च व ताठ असतात तशी आढ्यता व ताठपणा ज्याच्या अंगीं असतो तो अज्ञानानें परिपूर्ण आहे असें समजावें. ज्याप्रमाणें कांहीं लोक आपल्या धार्मिकतेच्या प्रसिद्धीसाठीं पिंपळास पार बांधितात आणि त्याची मुंज करितात त्याप्रमाणें जो आपल्या धर्मकृत्याची प्रत्येकाजवळ थोरवी गात असतो, किंवा मोरपिसांचा कुंचा जसा देवळांत सार्वजनिक उपयोगासाठीं उभाकरून ठेविलेला असतो त्याप्रमाणें आपलें दातृत्व जो सर्वतोमुखीं करितो. जो आपल्या विद्वत्तेचें स्तोम माजवितो, व पुण्याची थाळी पिटतो, व प्रत्येक कृत्यांत ज्यास प्रतिष्ठेची हांव असते, जो आपल्या अंगास सुगंधि द्रव्यें फांसतो परंतु लोकांची सेवा करण्याची पाळी आली असतां आंग चोरतो;

असा जो पुरुष आहे तो अज्ञानाची केवळ मूर्ति आहे असें समज. आणि अरण्यांत वणवा लागला कीं सर्व चराचर वस्तु जळून जातात. त्याप्रमाणें ज्याच्या वर्तनानें सर्व जगास दुःख होतें तो सहज जें कांहीं बडबडतो तें पहारेच्या टोकाहूनही ज्यास्त टोंचतें आणि त्याचा हेतु पाहूं गेलें तर तो विषाप्रमाणें मारक असतो. अशा पुरुषाचे ठिकाणीं अज्ञानाचा सुकाळ असतो; तो अज्ञानाचा सागरच होय व तो हिंसेचें माहेरघर असतो.

२५

त्याप्रमाणें जो सिद्धांत तुह्मांस पटेल तो आपण घ्यावा जो आपल्या कसोटीस न उतरेल तो मला परत करावा; समज ( ज्ञान ) नसणें हीच लहानाची सामान्य व्याख्या होय आणि जरी अज्ञानमूल असलें तरी त्याला पाहून आईबापांस आनंद होत नाहीं काय? उलट त्याचें तीं कौतुकच करितात. त्याप्रमाणें तुह्मी साधुसंत माझे मायबाप आहां आणि तुमच्या जवळ लडिवाळ पणानें जें मी बडबडतों त्याचाच हा ग्रंथ आहे असें समजा.

अहो! महाराज! आपल्या सारख्या सर्वज्ञ मंडळीस 'लक्ष द्या' असें जें मी सांगतों तें सांगणें आढ्यतेचें नसून ती लडिवाळपणाची नम्र विनंती आहे. अहो! समर्थ श्रोते हो! आपल्यासारखें सुखसरोवर मला प्राप्त झालें आहे ह्मणून मी यथेच्छ सुखसेवन करीत आहें; आणि याठिकाणींही जर मी भिडस्तपणा धरला तर माझी तृषाशांति होण्यास अन्य स्थळ कोठें आहे? बाकी मुलाचे बोबडे शब्द ऐकून आणि त्याला वेडीं वांकडी पाउलें टाकतांना पाहून कौतुकानें आईच्या चित्तास जसा आल्हाद होतो, त्याप्रमाणें आपल्यासारख्या संतजनांची कृपादृष्टि कशी तरी मजवर व्हावी या आशेनें मी आपणाशीं सलगी करीत आहें. नाहींतर आपल्यासारख्या सर्वज्ञ श्रोत्यांस मी ह्मणजे कांहीं सांगावें असें नाहीं. सरस्वतीच्या मुलास 'श्री गणे' चा धडा देऊन का विद्या शिकविली पाहिजे?

## गद्यानुवाद

१

तुकाराम रामदास यांच्यासारख्या भक्तिमान् संतांनीं आपले ग्रंथ मराठींत लिहिल्यामुळें तिला वेदांची योग्यता आली आहे. मुक्तेश्वर पंडित व पंत

यांनीं काव्यद्वारा तिच्यांत रस व प्रसाद ओतल्यामुळें संस्कृत भाषेचा भारदस्तपणा तिला प्राप्त झाला आहे. तेव्हां ओजस्, गांभीर्य व माधुर्य या गुणांची याचना इतर भाषांजवळ करण्याची तिला आतां मुळींच अपेक्षा राहिलेली नाही. हें विधान आह्मीं वृथाभिमानानें केलें आहे असें ज्यांना वाटत असेल त्यांनीं जर मोलस्वर्थ व कॅंडी यांच्या कोशांतील प्रस्तावना वाचून पाहिल्या तर त्यांची संशयनिवृत्ति होऊन मराठीची खरी योग्यता त्यांस कळेल, परंतु इतके श्रमही घेण्याची कळकळ अनेकांच्या अंगीं नसते. तेव्हां अशा मंडळीच्या निंद्य अज्ञानामुळें व हेकटपणामुळें मराठीची हेळसांड होत आहे. हे लोक तिच्या उत्कर्षार्थ झटावयाचें टाकून उलट आपली इतिकर्तव्यता झाली, आपण मोठे जाडे विद्वान आहोंत अशा समजुतीनें पक्के आळशी बनले आहेत. या कारणामुळें मराठीचा उत्तरोत्तर ऱ्हास होत चालला आहे.

२

एकदां ग्रंथवाचनाचें खरें रहस्य कळलें कीं त्यापासून वाटेल त्या मनुष्यास शांति, सुख व समाधान हीं मिळवितां येतात. स्वर्गीयसुख मृत्युलोकांत फक्त ग्रंथालयांतच मिळतें; दुःखाचा लेश कोठें वास करित नसेल तर तो ग्रंथालयांतच होय; या संसारसागरांतील प्रचंड लाटांचे आघात चुकविण्यास ग्रंथालयासारखा दुसरा आसरा नाहीं. त्याच्याठिकाणीं उच्चनीचपणाचें वैषम्य वास करित नाहीं. धनदौलतीची भीड तें धरित नाहीं. त्याला भूलोकावरील स्वर्ग बनवितां येईल, मात्र त्याचा सदुपयोग केला पाहिजे. याठिकाणीं अनेक प्रसिद्ध राजकारणपटु, कवि व ज्ञानी लोक काय म्हणतात हें प्रत्यक्ष भेटीनें समजतें, विचारी पुरुषांचे विचार कळतात, व प्रगल्भ आणि बुद्धिमान् मनुष्यांनीं आपल्या कल्पनाचातुर्यानें निर्मिलेल्या फलाचा आस्वाद आपणांस घ्यावयास मिळतो.

३

कर्णेंद्रिय द्वारा मनुष्यास पुष्कळ ज्ञान मिळतें. ईश्वरानें मनुष्यास ज्या देणग्या दिल्या आहेत त्यांत वाचेची देणगी अगदीं बिनमोल आहे. तिच्यामुळें एकाचें मनोगत दुसऱ्यास सहज समजतें. मनुष्याच्या ज्ञानाची वृद्धि मुख्यतः कर्णेंद्रियाकडूनच होते. शिक्षकाचे शब्द कानीं पडल्यावरच आपले शिक्षणास प्रारंभ होतो हें कोणास माहीत नाहीं असें नाहीं. लिहिण्याची युक्ति जोंपर्यंत कोणास ठाऊक नव्हती तोंपर्यंत सर्वांस श्रवणानेंच ज्ञानार्जन करावें लागे. लेखन कला साध्य झाल्यावर ज्ञान देण्याचा व तें चिरायु करण्याचा जो नवीन मार्ग सुरू झाला तो सर्वश्रुतच आहे.

४

यथार्थदीपिकेनें वाचकांचें केवळ चित्तरंजन करावें हा ग्रंथकाराचा उद्देश नसून लोकांस गीतेचें यथार्थ ज्ञान करून देण्याचा मात्र त्यानें विडा उचलला होता. तदनुसार त्यानें आपल्या कल्पनेच्या भराऱ्यांस पुष्कळच दाबांत ठेविलें. अलंकाराचा उपयोग रसोद्दीपनार्थ न करितां केवळ स्पष्टार्थाकरितांच केला असल्यामुळें कवीनें त्याच्यांत गूढता ठेविली नाहीं. एकाद्या गोष्टीचें केवळ दिग्दर्शन करून तिजसंबंधीं वाचकांची आतुरता व जिज्ञासा प्रदीप्त करण्याचा जो कादंबरीकारांचा मार्ग त्याचा अवलंब पंडितानीं मुळींच केला नाही. अर्थात् त्यांनीं दिलेले दृष्टांत कल्पनासृष्टींतले नसून नेहमींच्या व्यवहारांतले आहेत. कवि कल्पनांतच राज्य करणारा असला कीं त्याचीं उदाहरणें व दाखलेही काल्पनिक व नवीन असतात, व त्यांच्यायोगानें वाचकांची चित्तवृत्ति व औत्सुक्य इतकीं जागृत होतात कीं तो ग्रंथ त्यांच्यानें खालीं ठेववत नाहीं. ते कल्पना तरंगांत तल्लीन होऊन जातात. आणि गारोड्याचा खेळ पहातांना आपल्यास सत्य काय व मिथ्या काय याचें जसें भान रहात नाहीं तद्वत असले चित्ताकर्षक ग्रंथ वाचणारांची स्थिति होते. हें जें ऐंद्रजाल करण्याचें सामर्थ्य त्यासच आपण कवित्व ह्मणतों. परंतु अशा प्रकारचें ऐंद्रजाल निर्मून पंडितास आपल्या वाचकवर्गास रिझवावयाचें नव्हतें. याच कारणावरून पंडित व ज्ञानदेव यांच्या ग्रंथांच्या दिशा अगदीं परस्पर भिन्न आहेत.

५

नंतर आपलें सैन्य मागें ठेऊन निजामन्मुलुख एकटाच पुढें गेला व बादशहास भेटला. त्यावेळी बादशहा त्यास रागानें ह्मणाला कीं आज दहा वर्षे झालीं तरी तुह्मीं वसूल दिला नाहीं व त्याचा हिशोब ही सांगतला नाहीं. समक्ष येऊन भेटण्याची तर तुह्मी मुळींच पर्वा करीत नाहीं. अशा प्रकारें तुमचें वर्तन अगदीं बेताल झालें आहे. याप्रमाणें उन्मत्त होऊन तुह्मी आह्मांशी दांडगाई करितां हें ठीक नव्हे. हें कठोर भाषण ऐकून निजामन्मुलुख मोठ्या मिनतवारीनें ह्मणाला कीं आह्मी तुह्मांस मग्रुरीचा जबाब कधींच दिला नाहीं. परंतु इकडे आपल्याकडे जा ये करीत बसावें का तिकडे बंडाळी माजली आहे तिचा मोड करण्यास लागावें? सध्यांही बंड चालूच आहे व त्यानें मजवर पाठविलेल्या खावंदांच्या

सैन्याची ही दाणादाण करून टाकिली, व त्यास पळ काढण्यास लावलें. तेव्हां या बंडवाल्याचें पारिपत्य खावंदांनीं करावें अशी माझी प्रार्थना आहे. नवाबांचे हें भाषण चाललें आहे तोंच बंड येऊन पोहोंचल्याची ओरड बादशहाच्या कानावर आली तेव्हां त्यास नबाबाच्या ह्मणण्याची सत्यता पटली.

६

या विस्तीर्ण भूतलावरील प्रत्येक वस्तु आपणास ईश्वराच्या अगाध ज्ञानाची शक्तीची व चातुर्याची साक्ष पटविते ! परंतु विषयांध झालेल्या लोकांस हें ईश्वराचें प्रभुत्व कसें दिसावें ? तथापि जे कोणी डोळस असतील त्यांनी जर विचारपूर्वक सृष्टीचें निरीक्षण केलें तर या जगद्विधात्याचें कौशल्य पाहून ते आश्चर्यानें थक्क होऊन जातील यांत संशय नाहीं. अत्यंत अज्ञानी माणसांस सुद्धां लक्षपूर्वक सृष्टिनिरिक्षण केल्यावर परमेश्वराच्या कल्पनातीत कृतीचें कौतुक वाटलेंच पाहिजे. निसर्गाचें अवलोकन करीत असतां जो आनंद होतो तो अगदीं निर्भेळ असतो. परंतु विषयसुखमात्र दुःखाच्या छटेशिवाय कधींच मिळत नाहीं.

७

श्री.

रा. रा. त्रिंबक हरी यांस. सा. न. वि. वि. हैदरच्या युद्धांत नीलकंठराव पडले ही गोष्ट अत्यंत वाईट झाली. ह्मातारपणीं तुमच्यावर ही आकाशांतील कुऱ्हाडच पडली. असो ! ईश्वरी इच्छेस इलाज नाहीं. भवितव्यता चुकणें नाहीं. परंतु रणांगणांत नीलकंठराव जिवावर उदार होऊन मोठ्या निकरानें लढले व शेवटीं धारातीर्थी त्यांनीं देह ठेऊन आपली निःसीम स्वामिभक्ति दर्शविली. जगल्यास विजयश्री माळ घालील नाहींतर स्वर्गांत अप्सरा माळ घालतील ही गोष्ट त्यांच्या मनांत पक्की बाणली होती. व तशीच गोष्ट घडून आली. गेल्याचा शोक करीत बसल्यानें तो ह्मणजे पुन्हा परत येतो असें नाहीं. तेव्हां अशावेळीं विवेकानेंच समाधान होणार आहे. आपण सुज्ञ अहां विवेक करून दुःखाचा विसर पाडून घ्यावा. नीलकंठरावानें आपल्या देहाचें सार्थक केलें, हें मनांत आणून त्याजबद्दल शोक करूं नये एवढेंच शेवटचें सांगणें आहे. कळावें हे विनंति.

८

स्वामीनीं सरस्वती इतकी प्रसन्न करून घेतली होती कीं आज जे सकल कलांचे व ज्ञानाचें माहेरघर होऊन बसले आहेत, अशा अमेरिका व इंग्लंदसारख्या देशांतील लोकही त्यांचें वक्तृत्व ऐकून तल्लीन होऊन जात हें कोणास सांगितलें पाहिजे असें नाहीं. मग अशा लोकोत्तर पुरुषाची थोरवी आह्मी काय गावी ! त्यांचीं तीं ब्रह्मज्ञानानें थबथबलेलीं भाषणें ऐकण्याचें लोकांस अगदीं वेडच लागून गेलें होतें. स्वामीचें ज्ञानप्रतिपादन अनुभविक गोष्टींनीं सुबोध होई, त्यांचा वाक्प्रवाह एकसारखा चालत असून चित्तवेधक असे, प्रगल्भ विचारांची व माहितीची त्यांच्या व्याख्यानांत नेहमीं रेळचेळ उडत असे, केव्हां केव्हां सत्याच्या श्रवणानें श्रोतृगण संतुष्ट होऊन त्याचें मन आनंदसागरात बुड्या मारी. प्रसंगोपात्त मूर्खांना त्यांच्या वेड्या चाळ्यांबद्दल हंसत हंसत शालजोडींतले मारण्यासही त्यांनीं कमी केलें नाहीं. अशीं व्याख्यानें ह्मणजे एकंदरींत एक अलभ्य लाभच होय. ह्मणून त्यांच्या योगानें चौऱ्यांयशीच्या फेऱ्यांत सांपडलेल्या लोकांचें अज्ञान झडून जाऊन त्यांस ज्ञानबोध झाला असेल यांत संशय नाहीं.

९

नाना राजकारभार नुकताच पाहूं लागले असल्यामुळें जरी मोठे अनुभवशीर नव्हते तरी एकादें महत्वाचें काम आंगावर घेऊन तें सिद्धीस नेण्याची पात्रता त्यांच्या अंगीं खास होती. मराठ्यांच्या उत्कर्षाची पराकाष्ठा नानासाहेबांच्या वेळीं झाली होती. नानांनाही ते सोन्याचे दिवस आठवत होते व त्याबद्दल त्यांना अभिमानही वाटे पेशवाईबद्दल भानूंच्या घराण्याला जसें निःसीम प्रेम वाटत होतें तसें नानांस ही होतेंच. त्यांत के. नानासाहेबांशीं जो त्यांचा सहवास झाला त्यानंतर तें प्रेम अधिकच दृढावलें. पेशव्यांच्या सहवासांत नित्य असल्यामुळें राज्यांतील मोठे मुत्सदी, सरदार व सावकार यांच्याशींहीं नानांचा सहजच परिचय झाला होता. राज्यव्यस्थेचें धोरण कसें राखावें याचा धडा ते नानासाहेब व भाऊसाहेब यां सारख्या वाक्बगार गुरूंजवळ शिकले होते.

१०

संस्कृत भाषेचें चांगलें ज्ञान असल्याशिवाय संस्कृत काव्यांवर अभिप्राय देतां यावयाचा नाहीं. त्या भाषेंत शब्दसौष्ठवास विशेष महत्व दिलें गेल्यामुळें तो

फार श्रुतिमधुर झाली आहे, परंतु हें माधुर्य भाषांतरांत लुप्त होतें. संस्कृताचा दुसरा गुण ह्मणजे समासबाहुल्य; या गुणानें तर दुधांत साखर टाकल्याप्रमाणें तिला गोडी आली आहे. भाषांतरांत या समासांचें अनुकरण करूं लागल्यास ( दुधांत साखरे ऐवजीं मीठ घातल्यासारखा प्रकार होतो. ) तें बरोबर न साधून सर्वच विरस होतें. संस्कृत व इंग्रजी भाषांतील काव्यमीमांसाशास्त्रांत विशेष साम्य नसल्यामुळें संस्कृत काव्याचा रसास्वाद इंग्रजी तर्जुम्यानें बरोबर घेतां येत नाहीं. आणखी इंग्रज लोकांना हिंदु कवींच्या कल्पनांची व मनोव्यापारांची चांगली ओळख नसल्यामुळें त्यांच्या काव्याशीं त्यांचें तादात्म्य होणें अशक्य होतें.

## ११

हा असंभाव्य प्रकार घडलेला पाहून सर्व सभासद आश्चर्यानें थक्क होऊन गेले व आजचा चमत्कार 'न भूतो न भविष्यति' पैकीं झाला असें ह्मणून प्रत्येकानें आश्चर्यपूर्वक तोंडांत बोट घातलें. तपेंच्या तपें वेदाध्ययनात घालविली तरीही जो वेद पूर्ण साध्य होत नाही तो वेद ज्याला मनुष्य वाणी नाहीं अशा ज्ञानहीन रेड्याच्या तोंडून, त्याच्या डोक्यावर नुसता हात ठेवल्याबरोबर वदविणारा पुरुष परमेश्वरी अवतारच समजला पाहिजे. आह्मी वेदाध्ययन केल्यामुळें कर्म हेंच मुख्य होय अशा समजुतीनें खऱ्या ज्ञानाला आचवलों आहों. 'लोकां सांगे ब्रह्मज्ञान आपण कोरडे पाषाण' ही म्हण आम्हास बरोबर लागू पडते. याप्रमाणें त्या ब्राम्हणांस पश्चात्ताप झाला "हे साक्षात् प्रतिपरमेश्वरच होत. यांना कसलें प्रायश्चित! दर्शनमात्रें करून सर्व जग पवित्र करण्याचें ह्याचें सामर्थ्य! ! हीं चारही भावंडें प्रत्यक्ष भागीरथी सारखीं शुद्ध आहेत! यांच्या आईबापांची, कुटुंबाची, कुळाची व जन्मभूमीची थोरवी गावी तितकी थोडीच!" असा त्यांचा धन्यवाद गात गात त्या सर्व पैठणकर ब्राह्मणानीं त्यांपुढ लोटांगण घातलें.

## १२

नानासाहेब व तो काळा गृहस्थ हे मोठे स्नेही होते; आणि एक व्यसनाच्या व एक स्वभावाच्या माणसांत बहुधा मैत्री असते असा सामान्य नियमच आहे. तेव्हां वरील स्नेह नियमानुसारच होता. उच्चनीच कुळाची मुर्वत न धरितां दुर्दैवानें आपल्यासारखाच नानासाहेबांवरही वरवंटा फिरवावा—निदान फिरविण्याचा आव तरी घालावा—हें पाहून त्या काळ्या गृहस्थास अतिशय दुःख झालें व

आपल्यासारखीच यांची दशा झालेली पाहून थोडेसे त्यास बरेंही वाटलें. परंतु समदुःखी माणसास पाहून झालेलें हें समाधान क्षणिक होतें. कारण आपल्या दोघांच्या स्थितींत व शत्रूंत जर्मनअस्मनाचें अंतर आहे ही गोष्ट तो कांहीं विसरला नव्हता; परंतु सध्यां मौनव्रतच धारण करणें बरें असें वाटल्यामुळेंच जणूं काय त्यानें आपल्या दुःखाकुल मुद्रेवर किंचित आनंदाची छटा धारण केली होती.

## १३

मोरोपंतांनी एकदां कविता करण्यास आरंभ टोकलें कीं कवितांची इतकी गर्दी उडून जाई कीं त्यांना त्या लिहून काढतां काढतां पुरे वाट होई. अनभ्यस्त व निरक्षर माणसांस कष्टावह भासणाऱ्या गोष्टी पंत आपल्या अलौकिक विद्वत्तेच्या आणि धारणेच्या जोरावर तेव्हांच करून टाकीत. नानाजीस मोठमोठ्या वजनदार वस्तु उचलण्याची दिक्कत कधीच वाटत नसे अथवा कसल्याही राजकीय मसलती करितांना आपण बुद्धिबळांचा डाव टाकितों आहों कीं काय असें नानांस वाटे. त्याचप्रमाणें मोरोपंतांचें भाषाप्रभुत्व इतकें विलक्षण होतें कीं, अपूर्व शब्दालंकार साधणें अथवा रामायणाची रचना नव्या नव्या १०८ रीतींनें करणें ह्या गोष्टी त्यास एखाद्या तालीमबाजास कसरतीच्या उड्याप्रमाणें अगदींच सोप्याशा वाटत. पंतांच्या कवितेंत संस्कृत शब्दांचा भरणा फार आहे, रसालंकारांची गर्दी उडाली आहे, वृत्तांचें वैचित्र्य साधलें आहे, यमकानुप्रासांचे चमत्कार दाखविले आहेत परंतु तिच्यांत खऱ्या काव्याची प्रतीति मात्र कोठेंच होत नाहीं. अशा हटकवींत प्रसाद व हृदयंगमता यांचा अभावच असावयाचा. अशा कवितांस काव्य तरी म्हणतां येईल कीं नाहीं–हा प्रश्नच आहे. इ. दूषणें जे पंतांच्या कवितेस देतात ते बहुधा आपल्यावरून जग ओळखतात असेंच म्हणण्याची पाळी येते.

## १४

मार्गानें जात असतां आह्मांस फारच रमणीय देखावे दृष्टीस पडले. सर्व जमीन हिरव्यागार गवतानें वेष्टिलेली होती ह्मणून तिला एकप्रकारची साहजिक शोभा आली होती. लहान लहान डोंगरांच्या रांगा लहान लहान झाडांनीं आच्छादित असल्यामुळे भयंकर न दिसतां डोळ्यांना मोठा संतोष देत. मधून मधून दिसणाऱ्या ओहोळांनीं व नद्यांनीं तर ती वनशोभा अधिकच खुलत होती. आसपा–

सच्या झुळझुळ वाहणाऱ्या निर्मळ झऱ्यांचा सुंदर देखावा पाहून व गोड आवाज ऐकून मनास मोठा संतोष होई. लांब दिसणारे प्रवाह इतके शुभ्र दिसत होते की जणू काय क्षितिजावर चांदीच्या रसाचा एक पट्टाच ओढिला आहे असे भासे. अशी वनशोभा पहात पहात संध्याकाळ होत आहे तों लंडन शहाराजवळ आह्मीं येऊन पोहोंचलों. हें शहर जरी एवढें विस्तीर्ण आहे, त्यातील लोक जरी अतिशय उद्योगी आहेत, त्यात सुखाची साधनें जरी विपुल व आश्चर्यकारक आहेत, त्यांत भिन्न भिन्न दिशांनीं मेहनत करणाऱ्या जरी स्तुत्य मंडळ्या आहेत तरी बाहेरून पाहाणारास तें मुळीच चित्ताकर्षक वाटत नाही.

१५

मराठी भाषेला सर्व महाराष्ट्रभर सर्व जातींचे लोक जो आज अभेदबुद्धीनें मान देत आहेत त्याचें नवल वाटण्याचें कारण नाहीं. कारण ज्यांवर ईश्वरी अनुग्रह झाला आहे अशा—मुकुंदराज, ज्ञानेश्वर, सूर्यज्योतिषी, एकनाथ, रामदास, तुकाराम, मोरोपंत व चिपळोणकर इ. ग्रंथकारांनी आपले ग्रंथ तींत लिहून तिला अभियुक्त बनविली आहे. स्थानभेदानें व जातिभेदानें भाषेचें स्वरूप थोडेसें पालटतें खरें, परंतु ग्रंथांत हे क्षुद्र भेद नाहींसे होऊन भाषेचें सामान्य रूप दृष्टीस पडतें. महाराष्ट्रीयांना आपल्या स्वभाषेचा जो अभिमान वाटतो तो यथायोग्य आहे. मराठीसारखें शब्दभांडाराचें ऐश्वर्य पृथ्वीवर दुसऱ्या थोड्याच भाषांत सांपडेल. मराठीच्या द्वारा वाटेल त्या गहन अथवा क्लिष्ट विषयाचें निरूपण मोठ्या सुखानें करितां येतें, हा एक विशिष्ट गुण तिच्यात आहे. आणखी मोठमोठ्या पुष्कळ विद्वानांनीं आपले प्रौढ, भारदस्त, अभियुक्त, व सुंदर असे विचार तिच्यांत ग्रथित केले असल्यामुळें सर्व महाराष्ट्राला ती उत्तरोत्तर अधिकाधिकच प्रिय होऊं लागली आहे.

१६

इतिहासाच्या अध्ययनापासून मन मोठें व शांत होतें. हें स्थैर्य आणि ही प्रगल्भता येण्याचें कारण कोणास सांगितलें पाहिजे असें नाहीं. एका मार्मिक ग्रंथकाराचें असें म्हणणें आहे कीं, इतिहास इतिहास जो म्हणतात तो सर्व प्रसिद्ध पुरुषांची चरित्रें एकत्र करून झालेला असतो म्हणजे या पुरुषांच्या पराक्रमाशिवाय इतर गोष्टींचें वर्णन इतिहासांत फारसें नसतें; आणि हा भाग इतिहासांतून वजा केला तर बाकी कांहींच राहणार नाहीं. म्हणून सर्व जगावर ज्यांचीं नावें गाजत

आहेत अशा निरनिराळ्या देशांत होऊन गेलेल्या थोर पुरुषांच्या चरित्रांचा सदैव अभ्यास करणें हें अत्यंत हितावह आहे. मोठ्या लोकांच्या संगतीपासून फार मोठा लाभ होत असतो. मराठी व संस्कृत काव्यांत सत्समागमाची थोरवी अनेक गोष्टीच्या रूपानें व उदाहरणांनीं गाईलेली आढळते. तुकाराम वगैरे मराठी कवींनीं संतांस परीसाची व भक्तांस लोखंडाची उपमा दिली आहे ती प्रस्तुत संबंधांत फारच योग्य व साजेसारखी आहे.

१७

रंगरावाची बुद्धि मूळची किती व्यापक व तीव्र होती आणि पुढें शिक्षणानें तिची व्याप्ति व गांभीर्य ही किती वाढली याचा विचार केला पाहिजे. गुरु हे वनासारखे स्थिर असतात परंतु शिष्यांची बुद्धि ही जलौघा सारखी चर असते. जलौघ हा वनांतील पाणी घेऊन जातो तसे शिष्य जन्मापासून गुरूं जवळून ज्ञान घेऊन जातात. पण वनें आणि गुरु त्याजबरोबर जात नाहीत. ( तात्पर्य कीं मनुष्याच्या चांगले वाईटपणाबद्दल साधारणतः आपण त्यासच जबाबदार धरतों परंतु वास्तविक ती जबाबदारी त्याच्या गुरूवरच टाकिली पाहिजे इ. ) ह्मणून रंगरावाच्या गुरूंचा संक्षिप्त इतिहास याठिकाणीं देण्याचें आह्मी योजिलें आहे. याचें कारण असें की ज्या ज्या योग्यतेचे गुरु व त्याचें शिक्षण असतें त्या त्या योग्यतेचे त्यांचे शिष्य पुढें निपजतात अरिस्टॉटल सारखा गुरु मिळाला ह्मणूनच शिकंदरने युद्धकलेंत, शौर्यांत व साहसांत लौकिक मिळविला त्याचप्रमाणें शिवाजी महाराज मोठे शूर, थोरमनाचे, स्वमाता व स्वदेश यावर प्रीतिकरणारे, व मोठे राजकारणी असे जे निपजले त्याचे श्रेय सर्वतोपरी त्यांचे गुरु जे रामदास व दादाजी कोंडदेव यासच दिलें पाहिजे

१८

कवीला, स्वेच्छेनें, एखाद्या कुशल बहुरूप्याप्रमाणें वाटेल तो वेष धारण करितां येतो. वायूच्या गतीस जसा कोठें अवरोध होत नाहीं तद्वत त्यासही कोठे प्रतिबंध नसतो. मनाचा व्यापार प्रतिक्षणीं जसा चालू असतो तसा कवीचाही असतो. हुषार जादुगार वाटेल ती वस्तु निर्माण करितो तशी कविही करितो. कसलेला नाचाडी जसा गलवत स्वेच्छेनें हवे तसें नाचविण्यास कचरत नाहीं तसा कवि वाटेल त्याठिकाणीं कल्पनेच्या भराऱ्या मारण्यास भीत नाहीं. सृष्टिकर्ता जसा अनंत व नित्य आहे त्याप्रमाणें कवीचे बोल सर्वकालीं व सर्व ठिकाणीं अबाधित

असतात. कवीच्या दृष्टींत दुर्बिणीचे व सूक्ष्मदर्शकयंत्राचे असे दुहेरी गुण असतात; त्यामुळें कोठलीही वस्तु–मग ती दूर असो अथवा सूक्ष्म असो–कवीला अगोचर नाहीं; व तिचें वर्णन तो इतकें हुबेहुब करितो कीं ती वस्तु लोकांना प्रत्यक्ष डोळ्यापुढें उभी दिसते. पाताळ अथवा स्वर्ग यांचीं अस्सल वर्णनें मिल्टन अथवा कालिदास यांच्या काव्यांत तुह्मांस भरपूर सांपडतील. भिन्न व्यक्तीचे भिन्न भिन्न स्वभाव व त्यांचें अंतरंग यांचा ओळख तुह्मांला करून घ्यावयाची असल्यास जगदविख्यात शेक्सपियर किंवा भवभूति यांच्या काव्याचें तुह्मीं परिशीलन करा.

१९

हैदरनें दुटप्पीपणाचें आपलें नित्य व्रत ह्यावेळींही मोडिलें नाहीं. लबाडी, कपट व कावेबाजपणा यांचें त्यास जणूं काय बाळकडूच पाजलें होतें. अशा स्थितींत त्यानें आपलें वचन पाळलें नाही यांत मोठेंसें नवल नाही. या लढाईंत त्याची अत्यंत अपकीर्ति व हानि झाली असतांही वचनभंगाचें पातक करण्यास न डगमगतां त्यानें तहाच्या एकंदर अटींस धाब्यावर बसविलें, आणि ‘मूळ स्वभाव जाईना’ ह्या म्हणीप्रमाणें वर्षप्रतिपदेच्या दिवशीं त्या दगलबाज हैदरानें त्रिंबकरावाचें जेवणखाण आटोपतें न आटोपतें तोंच त्याच्या गोटावर तोफांचा वर्षाव सुरू केला हें पाहून त्रिंबकराव वगैरे तिघे सरदार पट्टण किल्याच्या उजव्या बाजूनें गेले व विश्वासघाताबद्दल त्यास देहांत प्रायश्चित्त देण्याकरितां त्यांनीं घनघोर संग्राम सुरू केला.

२०

शेक्सपीअरला सर्व कवींत अग्रपूजेचा मान दिला पाहिजे याविषयीं कोणाचा मतभेद नाहीं; परंतु तो ईश्वरी अवतार होता व त्याची सर्वच कृति दैवी होती हें ह्मणणें सर्वांना रुचेल असें नाहीं. आपली अलौकिक बुद्धि व अचाट कल्पनाचातुर्य खर्चून त्यानें जें काव्य निर्माण केलें आहे त्याबद्दल सर्व मनुष्यकोटि त्याची ऋणी आहे असा स्तुतिपाठ त्याच्या भक्तांनीं पाहिजे तर खुशाल गावा; त्यास आमची ना नाहीं. परंतु शेक्सपीअरकालीं नाट्यकलेच्या उत्कर्षाचा कळस झाला व आतां तींत जास्त सुधारणा करणें अशक्य आहे, हें मत मात्र आह्मांस बिलकूल पसंत नाहीं. या अनंत कालाच्या व अफाट वसुंधरेच्या पोटीं काय काय आहे

याचें गणित कोणास करवेल ? त्याचप्रमाणें कालांतरानें प्रतिशेक्सपीअर अगर सवाई शेक्सपीअर निपजणार नाहीं ह्मणून कशावरून? ह्मणून जे कोणी भाग्यशाली असतील त्यांनीं त्याच्या अपूर्व काव्यामृतांत मनसोक्त बुड्या मारून आपलें बुद्धिजाड्य व चित्तक्षोभ यांपासून मुक्त व्हावें, व या कामांत त्यांनीं बिलकुल आळस करूं नये. परंतु त्यानें बहार कोठें केली आहे व तो घसरला कोठें आहे हें बिनचूक दाखविणारा जर एकादा समर्थ टीकाकार पुढें आला तर त्याच्या टीकेपासून फारच लाभ होणार आहे. ' पुढल्यास ठेंच आणि मागला शहाणा ' या ह्मणीप्रमाणें तर भावी कवीस आपला मार्ग सुखकर होईलच, पण या योगानें त्याच्या काव्यांचें खरें रहस्य लोकांस कळूं लागेल हा या चर्चात्मक लेखांचा दुसरा एक अमूल्य फायदा होय.

## २१

सत्याचाच जय नेहमीं होतो. या वर सांगितलेल्या सुधारणा सत्याला आणि सुविचाराला धरून आहेत तेव्हां त्यांचा स्वीकार जरूर केलाच पाहिजे. या मुख्य सुधारणा अंमलांत आल्यास तदानुषंगिक लहान सहान सुधारणा आपोआपच होतील. पहा एक जातिभेदाचा लोप झाल्यास हा स्पृश्य तो अस्पृश्य हा पवित्र तो अपवित्र, अमूक वस्तु वर्ज्य अमूक अवर्ज्य, हा पदार्थ पिण्यास योग्य तो अयोग्य वगैरे बखेडे आपोआपच मिटतील. एकदां मूर्तिपूजा नादान ठरली कीं, नवग्रहांचें स्तोम माजविणारे आपोआप नाहींसे होतील. चंद्रग्रहण व सूर्यग्रहणसमयीं येणाऱ्या सुतकाचा त्रास बंद होईल. छाछूं फांकू, जपतप, संध्या वैश्वदेव, हव्यकव्य, या सर्व गोष्टींस एकदम फांटा मिळेल. नास्तिकमताची सुधारणा रूढ झाल्यास भुतें खेतें, जाखाई चोखाई, वगैरे मंडळीस कोणी भीक घालणार नाहीं आणि स्वर्गनरकासारख्या असंभाव्य, हिडिस व खोट्या तर्कांचाही नायनाट होईल.

## २२

' एकाद्या कार्यास केवळ आरंभ केल्यानें तें कार्य सिद्धीस गेलें असें ह्मणतां येत नाहीं ' हें सत्तत्व ज्ञानदेव व तुकाराम यांचे ग्रंथ वाचून आपणास शिकलें पाहिजे. पर्यायानें सांगावयाचें ह्मणजे आपल्या मनांतील हेतु सिद्धीस जाण्यास आपण प्रयत्न सुरू केल्याबरोबर त्याच्या फलाची अपेक्षा करणें वाजवी नाहीं. फलप्राप्ति कालांतरानें कदाचित् होईल; परंतु ती होणें न होणें आपल्या स्वाधीनचें

नाहीं. सत्कार्य करण्याकडे मनाचा कल असल्यास त्यापासून फायदाच होईल आपलें मन शात होऊन तें ईश्वरभजनाकडे वळावें असें जर आपणास वाटत असेल तर ईश्वर ज्या ज्या गोष्टी करण्यास प्रेरणा करील त्या गोष्टी करण्याचा आपण निश्चय केला पाहिजे. ज्ञानदेव व तुकाराम असा उपदेश करितात कीं सर्व जग ब्रह्ममय माना. परंतु सामान्य लोकांचीं अशी भावना होणें अशक्य आहे असें पुष्कळांस वाटेल. पण असें वाटतें याला त्यांचे तेच कारण आहेत. त्यांच्या ठिकाणीं जे ईश्वरी गुण असतात तसे गुण दुसऱ्याच्या ठिकाणीं शोधण्याचें सोडून, त्यांचे दंभ, अभिमान, गर्व इ० दुर्गुण ते शोधूं लागतात. यामुळें त्यांच्यामध्यें असणारा ब्रम्हाचा अंश त्यास मुळींच दिसत नाहीं; आणि म्हणूनच ‘ अवघें देखें जन ब्रह्मरूप ’ या उपदेशाची त्यांस प्रातीति येत नाहीं.

२३

ऐन बारा वाजण्याची वेळ. ऊन्ह म्हणजे इतकें भयंकर कीं सर्व जीवजंतु अगदीं हैराण होऊन आपापल्या आश्रयस्थानीं लपून बसले. उष्णतेचा तडाखा इतका होता कीं निर्जीव वस्तु ही म्लान दिसूं लागल्या रात्रंदिवस जो अविश्रांत वहात असतो त्या वाऱ्याला ही मंदत्व येऊन तो झाडाझुडुपांत दडी मारून बसला. सरोवरें तळीं इत्यादिकांतील पाण्याचीही हालचाल बंद पडली, आणि तें इतकें स्थिर झालें कीं कांठच्या वृक्षवेलींचीं प्रतिबिंबें आरशासारखीं त्यांत स्पष्ट दिसत होती.

२४

नारायण आईबापांस ‘ जातों ’ म्हणून सांगून जो निघाला तो एकसारखा थेट वाट चालूं लागला. आपण फार जोखमाचें काम अंगावर घेतलें आहे व आपण जर नेटानें एकसारखे परिश्रम केले नाहीत तर त्यांत आपणास यश मिळावयाचें नाहीं हें त्यास पक्कें ठाऊक होतें. फुलपाखरूं जसें चंचल असतें तशी त्याची वृत्ति चंचल होती;व त्यानें आजपर्यंत अनेक कामें आरंभून त्यांपैकीं एक ही तडीस न नेल्यामुळें त्याचे बरेच दिवस फुकट गेले होते. त्यामुळें एकाद्या गोष्टीच्या पाठीस लागून ती साधण्यास लागणारे सतत उद्योग, पराक्रम, स्थैर्य वगैरे गुण त्याच्या अंगीं आहेत हें कोणास कळलें नव्हतें. अशा स्थितींतही त्याच्या आईबापांस अशी आशा वाटे कीं, त्याची लहर लागल्यास तो फार मेहनतीचीं, मोटीं व कठीण-

ही कामें करून टाकील. या आशेनेंच त्यांनीं त्याला तें जबाबदारीचें काम करण्यास सांगितलें होतें.

२५

सर्वत्र प्रचलित असलेले कोणतेही विचार चुकीचे आहेत हें सिद्ध करण्यास तयार होणें मोठ्या जबाबदारीचें काम आहे. प्रथमतः असें करणाऱ्या माणसाकडे कोणी लक्षच देत नाहीं, आणि अशा विषयाकडे जर लोकांचें चित्त कोणास आकर्षण करतां आलें तर तो पुरुष विलक्षण बुद्धिमान् व दैववान् आहे असें ह्मटलें पाहिजे. कोर्टांत वादी प्रतिवादींस न्याय मिळविण्यास पडणारी पंचाईत एक वेळ पुरवेल, पण आपलें ह्मणणें नुसतें ऐकून घेणारा काढण्यास, अशा माणसास जी पंचाईत पडते ती पुरवणार नाहीं. यदाकदाचित् त्यास कोणी श्रोते भेटलेच तर ते त्याच्याशीं बोलतांना नेहमीं सरळ मार्ग सोडून त्यास आडमार्गानें आडवितात. नेहमींच्या वहिवाटीप्रमाणें वादीवर पुराव्याची जबाबदारी असते. उदाहरणार्थ अमक्यानें खून केला असें जो ह्मणेल त्यानें खुनाचा पुरावा केला पाहिजे. मी खून केला नाहीं असें आरोपीस पहिल्यानेंच सिद्ध करावें लागत नाहीं. परंतु सामाजिक सुधारणेच्या बाबतींत ही सामान्य व्यवहारांतली वहिवाट सोडून लोक प्रतिवादीवरच पुराव्याचा सर्व बोजा लादतात.

---

# भाग ३ रा.

## अभ्यासाकरितां पद्य उतारे.

१

अगा प्रभुवरा तुला शरण मी सदा येतसें ।  
करूनि भजना तुझ्या, हृदय हें तुला देतसें ।  
असे दुरितयुक्त तें, तरि तुझ्या प्रसादें करीं ।  
विशुद्ध, अति नम्र मी, तरि मला स्वहस्तें धरीं ॥ १ ॥

अनादि परमेश्वरा तव पदीं सदा लेंकरूं ।
रमे; न जरि मी रमूं, तरि जगीं कसें मी करूं ॥
कसा तुजविणें विभो भवजलामधीं मी तरूं ।
कसा कुमदमत्सरादिक रिपूंशि मी संहरूं ॥ २ ॥
जवीं निशा ती हरपे पावुनियां दिव्य भानुतेजातें ॥
दुर्बुद्धिही तशी प्रभु स्तवितां तुजला स्वमानसीं जाते ॥ ३ ॥

कीर्तिकर—भक्तिसुधा.

२

( चूर्णिका )

ते करांबुजयुगीं मधुमालिका घेउनि, अंबुजनयना विदेहबालिका, कंदर्पासि रतीच्या परी, कंदर्पारातीसि दाक्षायणीपरी, कीं निर्जरनाथासि इंद्रायणीपरी, कीं सत्यलोकनाथासि सावित्रीपरी, कीं जगद्व्यापी नारायणासि लक्ष्मीपरी, श्रीरामसमीप पातली; तन्मनोहरमाला कंधरीं घातली; तंव जयजयकार केला वृंदारकवृंदांनीं; अद्भुत नाट्यकोलाहलवेणुवीणादिवादनविलास मांडला किंनरपुरुषगंधर्वतुंबरनारदांनीं; संकुलमल्लिकाकुसुमभरें हर्षोत्कर्षे वर्षिजे सुरप्रमदांनीं आनंदनंदहृदयारविंद भक्ते प्रवीर रघुनंदनमहिमा त्रिलोकीं लोक जयजयकारें गर्जती ॥

आनंदतनय—सीतास्वयंवर.

३

शतयोजन आयत, दशयोजन विस्तीर्ण सेतु, शंकेतें ॥
दे, गेला बुडवाया कोपाकुल भूमि बाहु लंकेतें ॥ १ ॥
किंवा कपिकटकोत्तरसिंधूद्गत बुभुक्षु कालाही ॥
दूर पसरला खाया रात्रिचरा क्षुद्र बेडकाला ही ॥ २ ॥
सेतु न तो यत्पतिनें स्वसुता नेली वृकें जशी एणी ॥
त्या लंकेची श्रीभूदेवीनें ओढिली असे वेणी ॥ ३ ॥

कीं पतितपति त्यागुनि विश्वशरण्याकडे रडत वाटे ॥
आली जी लंकाश्री तीचा तो सांजनाश्रुपथ वाटे ॥ ४ ॥
कीं रचिले स्वापयशें शोकानलदग्ध सागरोरचि तें ॥
सूचविले तर्क असे त्या सेतुवरें महासुधीरचितें ॥ ५ ॥

मोरोपंत.

४

नामावीण मुख सर्पाचें तें बीळ । जिव्हा नव्हे काळ सर्प आहे ॥ १ ॥
वाचा नव्हे नाम जळो त्याचें जिणें । यातना भोगणें यमपुरीं ॥ २ ॥
हरीवीण नाहीं कोणी सोडविता । पुत्र बंधु कांता संपत्तीचे ॥ ३ ॥
अंतकाळीं कोणी नाहीं बा सांगाती । साधूचे संगती हरि जोडे ॥ ४ ॥
कोटिकुळें तारि हरि अक्षरें दोनी । एकाजनार्दनीं पाठ केला ॥ ५ ॥

एकनाथ.

५

आतां वंदूं संत सज्जन । जे वैराग्याचे पंचानन ।
कीं ज्ञानांबरींचे चंडकीर्ण । उदय अस्त नसे जयां ॥ १ ॥
जे भक्तिसरोवरींचे राजहंस । जे का अविद्यारण्यहुताश ।
कीं ते पद्महस्ती विशेष । भवरोगा वैद्य होती ॥ २ ॥
कीं जीव पावे स्वपदासी । ऐसा मुहूर्त देणारे ज्योतिषी ।
कीं ते पंचाक्षरी स्वप्रतापेंशीं । पंचभूतांसी पळविती जे ॥ ३ ॥
कीं ते दैवी संपत्तीनें भाग्यवंत । मुमुक्षूंसी करिती दरिद्ररहित ॥
कीं तीं दयेचीं अद्भुत । गोपुरें काय उंचावलीं ॥ ४ ॥
संत श्रोते चतुर पंडित । माझें बोलणें अरुष अत्यंत ॥
जैसा सरस्वतीपुढें मूढ बहुत । वाग्विलास दावितसे ॥ ५ ॥
सूर्यापुढें जैसा दीप देख । जान्हवीस न्हाणी थिल्लरोदक ॥
कीं कनकाद्रि जो अतिसुरेख । त्यासी अलंकार पितळेचे ॥ ६ ॥
कामधेनूस अर्पिलें अजाक्षीर । कीं चंद्रासि शीतळ उपचार ॥
कल्पतरु कल्पिलें देणार । त्यास निंबोळ्या समर्पिल्या ॥ ७ ॥

रत्नाकरास काच समर्पिली । तैसी माझी हे अरुषबोली ॥
तरी तुह्मीं प्रीति बहु ठेविली । प्राकृत शब्दीं नवल हें ॥ ८ ॥

श्रीधर–रामविजय.

६

आहे सुंदर तळेंहि तेथें लहानसें, ज्या माजीं ।
नित्य शोभती बहुत फुलोनि सुवर्णकमळें ताजीं ॥ १ ॥
पांचेच्या पायऱ्या सभोंतीं असति ज्यांत उतराया ।
जयांत नेमस्तचि जल असतें क्रीडा स्त्रीस कराया ॥ २ ॥
वर्षाकाळहि येतां तेथें हंस सुखें वसताती, ।
जवळहि असतां मानस तिकडे कधींहि ते नच जाती ॥ ३ ॥
त्याच तळ्याच्या काठीं आहे क्रीडापर्वत, ज्याचें ।
नीळमण्याचें चमके सुंदर उंच शिखर तें सांचें ॥ ४ ॥
ज्याच्या भोंवतीं सुवर्णकदली झळकाति चित्रविचित्रा ।
विजेसहित, तुज देखुनि मजला आठवतो तो, मित्रा ॥ ५ ॥

चिपळूणकर—उत्तरमेघ.

७

संध्या शांत किती सुरम्य गमते ! चित्तास दे स्वस्थता ।
वाटे लावुनियां समाधि बसते ही योगिनी तत्वतां ॥
सायंस्नान करावया उतरला आदित्य हा सागरा— ।
मंत्रातें जपुनी विरक्त बुडि घे जो रंगवी वासरा ॥ १ ॥
शांता या लहरी अहा जलधिच्या साधूपरी वाटती ।
हो चित्त स्थिर ही जरी अविहत व्यापार न चालती ।
ऐकें रे घनघोरघर्घररवा ! नाहे कधीं खंड या ।
आहे मूर्ति अनंत ही ! स्मरवितें मूर्ति प्रभूची प्रिया ॥ २ ॥
पाहोनि जलधी बुड्या अमित घे आनंद डोहीं मन ।
होती हर्षनिमीलितेंहि नयनें, वर्षे मनीं चिद्धन ॥
बाळा ! वृत्ति जरी तुझी न दिसते ऐशी, तरी कोणगा ।
सांगे “ त्वद्धृदयीं वसे प्रभु न तो ” ? निर्वाच्य तो दांडगा ॥३॥

महाजनि–कुसुमांजलि.

८

शर्करेचिया वाळवंटी । घृतसरिता धांवती लोटीं ॥
दुग्धनदीच्या संगमबेटीं । पायसान्नें निपजलीं ॥ १ ॥
दधिमधूचें सरोवर । समुद्रतुल्य महाथोर ? ॥
कोरूनी कनकाचे गिरिवर । हेम रांजणीं शिखरणी ॥ २ ॥
ओदनाचे चंद्राचळ । वरान्नाचे कनकाचळ ॥
नवनीताचे हिमाचळ । द्रोणाचळ शाकांचे ॥ ३ ॥
आणीक भक्ष्यांचे पर्वत । भंगूं न शके अमरनाथ ॥
तोंही अर्जुनरूपें तेथ । वाढवाढी करितसे ॥ ४

मुक्तेश्वर—सभा.

९

करिति चरण तूझे जे शिळा दिव्य रामा, ।
हरुनि दुरित माझें होतु ते सेव्य रामा ।
भ्रमरमन पदाब्जीं पावहीं त्या विरामा, ।
भवहर ! भवचापध्वंस ! विश्वाभिरामा ॥ १ ॥

जगीं तू असा कीं घटीं एक माती । गुण श्लोककोटींत तूझे न माती ॥
निरूपीन त्या सिंधुच्या बिंदुमात्रा । पुरे तेंचि संसाररोगास मात्रा ॥२ ॥
महाऔषधांतून थोडेंच कांहीं । करी, सेवितां नाश वातादिकांहीं ।
पुरे आमुची हे अविद्या माराया । तुझें एकलें नाम जी ! रामराया ॥३॥
ह्मणोनि जे भागवतीं शुकानें । लीला तुझी वर्णिलि कौतुकानें ।
टीका तिची मी क्षितिलोकवाणी । करीन जेथें न सुखासि वाणी ॥ ४ ॥

वामनपंडित.

१०

नामें तारिले पातकी । नाम थोर तिहीं लोकीं ॥
नामें साधे मुक्ति । नाम कलीं तारक ॥ १ ॥
नको जाऊं वनांतरीं । रानीं वनीं आणि डोंगरीं ॥
बैसोनियां करीं । स्थिर चित्त निमग्न ॥ २ ॥
नामें साधलें साधन । तुटलें बहुतांचें बंधन ॥
एका जनार्दना शरण । नाम वाचे उच्चारी ॥ ३ ॥

एकनाथ.

११

गायत्री विकोन पोट जे जाळिती ॥ तयां होय गती यम लोकीं ॥ १ ॥
कन्येचा जे नर करिती विकरा ॥ ते जाती अघोरा नरकपाता ॥ २ ॥
नाम गाऊनियां द्रव्य जे मागती ॥ नेणों तयां गति कैसी होय ॥ ३ ॥
कैसें होय त्यांचें तेच हो जाणती ॥ आह्मांसी संगती न लगे त्यांची ॥ ४ ॥
आमुचा सांगाती आहे तो श्रीहरि । न लगे दुराचारी तुका ह्मणे ॥ ५ ॥

तुकाराम.

१२

अनुष्ठानें विप्रांकडुनि बहु तूझीं करविलीं;
शिरीं त्वन्नाथाच्या विमल जलधारा धरविली ।
अनाथा पांथस्था वसनधनदानें बहु दिलीं ॥
करोनीयां नानाव्रतनियम काया झिजविली ॥ १ ॥
असे नाना यत्न स्वसुतगदशांत्यर्थ करुनी ।
प्रसादाची तूझ्या बघत असतां वाट जननी ॥
कसा काळव्याळ प्रगटुनि अकस्मात् मम सुता ।
गिळोनि गेला तो पळुनि, तुजलाही न पुसतां ॥ २ ॥
होवोनि श्रांत, किंवा विधिवरच तुह्मीं देवतीं विश्वकार्यें ।
सारीं सोपूनि, निद्राव्रत पतकरिलें सांग गे ! आज माये ? ॥
होतें पूर्वीच ऐसें विदित मज तरी एकट्या त्या विधीला ।
भावें सेवोनि जातें सहज तरुनियां आज दुःखोदधीला ! ॥ ३ ॥

मोगरे.

१३

म्यां पूर्वार्जित साधिलें न, तुमचे, शास्त्रार्थ ना पाहिले, ।
श्रीसारस्वतकाव्यनाटकरसालंकार ना देखिले ॥
छंदोग्रंथ निरीक्षले न, यमकें चित्रेंविचित्रं तुकें, ।
दोषां सर्व क्षमा करा चतुर हो ! या धैर्य मातें निकें ॥ १ ॥
छंदज्ञाननिघंटनाटकरसालंकारकाव्यक्रिया ।
जो जाणे गुरुदेवतावर कृपा सारस्वतप्रक्रिया ॥

त्याचें शुद्ध कवित्व मान्य चतुरांमध्यें सभामंडळीं ।
वर्णी विठ्ठलदास तो कविजगद्वंद्य स्वयं भूतळीं ॥ ३ ॥

विठ्ठल कवि.

१४

कुंडीं कांत विराजमान बरवा तो वाट पाहे उभा ।
भेटाया निज वल्लभा उसळली तेजें तडित्सन्निभा ॥
जैसा दीपकले पतंग झडपी तैसी उडी टाकिली ।
ज्वाळांचे भडके नभीं उसळती, सूर्यप्रभा झांकली ॥ १ ॥
देवांनीं जयजेयकार करुनी पुष्पांजुळी वर्षती, ।
वर्णी विश्व, 'सुलोचना पतिव्रता हे धन्य ऐसी सती' ॥
लंकेशा अतिशोक, शून्य दिसती दाही दिशा लोचना ।
केला शीघ्रगती प्रवेश नगरीं झांकोनिया आनना ॥ २ ॥
राजांगना निघाति आननिं बुंथि घेती, प्राणान्त दुःखलहरी मयजेसि येती।
ज्येष्ठ स्नुषा वडिल पुत्र महाप्रतापी, त्या बोळवूनि उरला जिव हाचि पापी३

अनंत कवि.

१५

आतां कोणता अधिकारी । बोलिजे तो अवधारीं ।
निश्चयेंशीं श्रवण करीं । देव दत्ता ॥ १ ॥
सर्वही मिथ्या कळलें । सत्य तें असे एकलें ।
ऐसें जेणें निवडिलें । तोचि अधिकारी ॥ ३ ॥
द्रव्य दारा देखतां नयनीं । वमनासमान जो मानी ।
पदार्थमात्र न इच्छी मनीं । तोचि अधिकारी ॥ ३ ॥
गुरुपदीं आवडी कैशी । वियोगें घडी कल्पा ऐशी ।
काया अर्पिली सेवेशीं । तोचि अधिकारी ॥ ४ ॥
श्रीगुरुचिया निजकृपें, । भवसिंधु मारिला थापें ॥
काळही जयासी कांपे । तोचि अधिकारी ॥ ५ ॥

हंसराज.

१६

वहन ठेविलें भूमंडलीं । तो राघव धांवूनि आला जवळीं ।
जैसें तान्हें बाळ उडी घाली । धेनु जवळी आलिया ॥ १ ॥
मातेचे चरणीं मस्तक । ठेवी त्रिभुवननायक ।
मायेनें उचलोनि तत्कालिक । हृदयीं धरिला ते काळीं ॥ २ ॥
ह्मणे चतुर्दश वर्षेपर्यंत । बाळें माझीं गेलीं वनांत ।
सुकुमार चरणीं चालत । शीतोष्ण सोशितीं झालीं पैं ॥ ४ ॥
श्रीराम माझा राजहंस । सोडोनि अयोध्यामानस ।
पाठविला कंटकवनास । सांवळा डोळस सुकुमार ॥ ५ ॥
माझा रामचंद्र निर्मळ । वियोगराहू मध्यें सबळ ।
चतुर्दशवर्षें शुद्ध मंडल । वदनेंदु आजि देखला ॥ ५ ॥
चतुर्दश वर्षें क्रमिली रजनी । आजि राम उगवला वामरमणी ।
अयोध्याजनवदनकमलिनी । टवटविल्या एकदांचि ॥ ७ ॥
नवरंगमेघ रघुवीर । वियोगसमीरें नेला दूर ॥
देहक्षेत्र शोषिलें समग्र । आजिवरी आमुचें ॥ ८ ॥

श्रीधर.

१७

रघुनाथ-पादांबुज-चित्त-लग्ना । एकाकिनी शोकसरोनिमग्ना ।
सीता सती कंठित काळ होती । वृक्षा तुझी फार सहानुभूती ॥ १ ॥
विध्वंसुनी दुष्ट दशाननाला । भेटे अयोध्यापति जानकीला ।
करी तिला शांतवुनी अशोका । त्वन्नाम हो सार्थ खरें अशोका ॥ २ ॥
लंका जधीं सोडुनि जाय सीता । मनीं तिच्या जो अनुराग होता ।
तुझ्यावरी ठेवुनि सर्व गेली । पुष्पें गमे लाल ह्मणून झालीं ॥ ३ ॥
गेलीं पुराणें सगळीं लयाला । रामायणाचा जरि नाश झाला ।
स्मरेल ती वीरकथा अशोका । त्वद्दर्शनें केवळ सर्व लोकां ॥ ४ ॥

माधवानुज.

१८

मजवर विधे ! देवांना त्या नये करितां दया ।
अकरुण परी होसी तूंही अकारण कासया ॥

करिशि अथवा तूं कार्यातें न कारण पाहतां ।
प्रकृतिच तुझी आहे ऐसी विलक्षण तत्वतां ॥ १ ॥
विरह न मनोधार्मी माझ्या कृशानु अमूर्त हा ।
व्यथित करिती मातें ह्याच्या शिखा अति दुःसहा ।
नयनसलिलें जावें ह्यातें जरी शमवावया,
तरि न समजे कोठें राहे लपूनि तनूंत या ॥ २ ॥

मोगऱ्यांचीं फुलें.

१९

वेश्या आणि संन्याशी । मंडप घसणी होतसे कैशी ।
कोप आला श्रीपादासी । दंडें वेश्येसी ठोकित ॥ १ ॥
येरी विसरली देहासी । वृत्ती लाधली श्रीकृष्णासीं ।
रागें लाथा हाणोनि तिसी । विटाळ आह्मांसी कां केला? ॥ २ ॥
येरी हांसोनि कपाळ पिटी । अजूनि क्रोध न सोडी पोटीं ।
विटंबली दंडकासोटी । आत्मदृष्टि तुह्मां नाहीं ॥ ३ ॥
मी उत्तम पैं लहान । विषयभेदांचें अज्ञान ।
सर्वाभूतीं समसमान । निजात्मज्ञान तुह्मां नाहीं ॥ ४ ॥
नाहीं निजशांति रोकडी । तवं कां केली ताडातोडी ? ।
भगवीं नाशिलीं लुगडीं । उपाधी गाढीं श्रीपादा ! ॥ ५ ॥
शेंडी टाकीली उपटोनी । वासना वाढली चौगुणी ।
श्रीकृष्ण देखिलिया नयनीं । विटाळ मानी तो निजांधु ॥ ६ ॥

एकनाथ—रुक्मिणीस्वयंवर.

२०

चूर्णिका.

ऐसा मुलीचा स्थिर निश्चय पाहिला । होईल तोचि प्रकार भला । ऐसें मानूनि अश्वपति स्थिरावला । गणकमुखें सुमुहूर्तनिश्चय करविला । गोळा करूनि सकळ परिवार आपुला । सज्जकरूनि गजोष्ट्ररथतुरगपदातिदला । शाल्व-

नृप द्युमत्सेन सपरिवार तयें बहु संभ्रमें आणविला । सीमांतीं नारायणस्वरूपी सावित्रीस्वयंवृत, सकलगुणगणमण्डित तापसजनपरिवृत द्युमत्सेनासमवेत यथोचित सोपचार सत्यव्रत सत्यवान् वरदेव पूजिला । अनेक तूर्यस्वनश्रुतिमंत्रघोषणाभिनंदित अग्निब्राह्मणस्वकुलदेवतासाक्षिक विवाहमंगलसमारंभ यथासांग सालंकृतकन्याप्रदानें संपादिला ।

आगाशे.

२१

चरण क्षालितां धर्मातें । धाविन्नलीं त्रिलोकींचीं तीर्थें ।
तळीं वोढविती माथे । पवित्रपणा लागोनी ॥ १ ॥
अरुणसंध्याराग दोन्ही । मिनले बालार्कतेजकिरणीं ।
कीं पद्मरागमाणिकमणी । एकत्र पाया पातले ॥ २ ॥
चंद्रें शरीर कर्वतीं दिधलें । खंडूनी केलीं दहा शकलें ।
पदांगुळी जडोनि झाले । नखमणी चंद्रासारिखे ॥ ३ ॥
ध्वज अंकुश वज्र पद्में । उर्ध्वरेखा अति उत्तमें ।
सामुद्रिकें पाहतां उपमे । ठाव न दिसे यावया ॥ ४ ॥
कीं श्रीकृष्णपादांबुजीं पवित्र । प्रयागराज तीर्थ क्षेत्र ।
मिनली त्रिवेणी एकत्र । प्रत्यक्ष नयनीं दिसताहे ॥ ५ ॥

मुक्तेश्वर—सभापर्व.

२२

तत्व पुसावया गेलों वेदज्ञासी । तंव भरले त्यापासी विधिनिषेध ॥
तया समाधान नुमजे कोणे काळीं । अहंकार बळि झाला तेथें । १ ॥
ह्मणोनी तुझें नाम धरिलें सर्व भावें । उचित करावें पांडुरंगा ॥ ध्रु० ॥
स्वरूप पुसावया गेलों शास्त्रज्ञासी । तवं भरले तयापाशीं भेदाभेद ॥
एकएकाच्या न मिळती मतासी । भ्रांत गर्वराशि भुलले सदां ॥ २ ॥
पुराणिकांसि पुसूं स्वरूपाची स्थिति । तंव त्यासी विश्रांति नाहीं कोठें ॥
विषयीं ठेवुनि मन सांगती ब्रह्मज्ञान । तेणें समाधान नुपजे कदां ॥ ३ ॥

हरिदासासी पुसूं भक्तीचा उपाय । तंव तयापांशीं नाहीं भाव कोठें ॥
वाचेनें सांगती नामाचा बडिवार । विषयीं पडीभर सदाकाळीं ॥ ४ ॥
ऐसें विचारितां बहुत भागलों । ह्मणोनि शरण आलों पांडुरंगा ॥
भयाभीत झालों संसार करितां । नामा ह्मणे आतां तारीं मज ॥ ५ ॥

नामदेव.

२३

नामाविण काय वाउगी चावट । वायां वटवट हरीविण ॥ १ ॥
फुकटची सांगे लोकांचियां गोष्टी । राम जगजेठी वाचे नये ॥ २ ॥
मेळवूनि चाट करी सुरापान । विषयांच्या गुणें मातलासे ॥ ३ ॥
बैसोनि टवाळी करी दुजयाची । नाहीं गोविंदाची आठवण ॥ ४ ॥
बळें यम दांत खाय तयावरी । जंव भरे दोरी आयुष्याची ॥ ५ ॥
तुका म्हणे तुला सोडवील कोण । नाहीं नारायण आठविला ॥ ६ ॥

तुकाराम.

२४

सदा बोलण्यासारखें चालताहे ।
अनेकीं सदा येक देवासि पाहे ॥
सगूणीं भजे लेश नाहीं भ्रमाचा ।
जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ॥ १ ॥
क्रमी वेळ जो तत्वचिंतानुवादें ।
न लिंपे कदा दंभवादें विवादें ॥
करी सूखसंवाद जो ऊगमाचा ।
जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ॥ २ ॥
सदा रामनामें वदा पूर्णकामें ।
कदा बाधिजेनापदा नित्य नेमें ॥
मदालस्य हा सर्व सोडूनि द्यावा ।
प्रभाते मनीं राम चिंतीत जावा ॥ ३ ॥

रामदास.

२५

तव पादसरोरुहीं स्वचित्तभ्रमरातें रस चाखवूनि गोंवूं ।
तुज भक्त तुजे सदैव गाती मृग आह्मीं गुणगीतसक्त होवूं ॥ १ ॥
मज वाटतसे सभाग्य मोटें, भगवद्भक्त तयांत म्यां जुडावें ।
तदधीन तुज्या यशःसुधेचा ह्रद गंभीर तयामधें बुडावें ॥ २ ॥
तुज वर्णिति संत संगमुक्त प्रकृति-प्रेमळ तद्गणीं शिरावें ।
तुझिया गुणसागरांत माजें मन हें सैंधव माधवा ! विरावें ॥ ३ ॥
मन हें विषयीं उडीच घाली, विष हें जाणुनि यावरी विटावें ।
तव कीर्ति उदार कामधेनू तिस मीं होउनी वासरूं चिटावें ॥ ४ ॥

मोरोपंत—आशंसाष्टक.

## गद्य उतारे.

१

भाषा ही बहुधा अनादि आहे; तेव्हां कायद्याप्रमाणें वहीवाट जर पाहिली तर व्याकरणाच्यातर्फे फैसला न होतां प्रचाराच्याचतर्फे होईल. यास्तव संस्कृत वैयाकरणांचा पहिला मोठा सिद्धांत हा आहे कीं, 'प्रयोगशरणाः वैयाकरणाः' वैयाकरण हे प्रयोगाचे बांधील आहेत, त्याच्यापुढें यांचें शहाणपण खुंटतें. ते जसे असतील तसेच घेऊन त्यांस चाललें पाहिजे, त्यांशीं दांडगाई करून कांहीं उपयोग नाहीं. जसें शहर नदीच्या अनुरोधानें वसतें; शहराच्या अनुरोधानें नदी वहात नाहीं. त्याप्रमाणेंच भाषेच्या आनुरोधानेंच व्याकरण नेहमीं चाललें पाहिजे, त्याच्या अनुरोधानें ती कधीं चालायाची नाहीं.

निबंधमाला—लेखनशुद्धि.

२

ऐन मध्यरात्रीं शोणनदीच्या कांठच्या उंचवट्यावर बसलेल्या एका तरुण पुरुषाचे मनांत सूड घेण्याविषयींचे विचार घोळत होते. त्याच्या हृदयांतील क्रोधाग्नि अतिशय भडकला होता, व तो अगदीं वाजवी आहे, असें जाणूनच सर्व सृष्टीही त्याच्याप्रमाणें क्रुद्ध झालेली दिसत होती. पूर आल्यामुळें नदीचें पात्र विस्तृत होऊन तिच्या प्रवाहास जोरही विलक्षण आला होता. आकाश ढगांनीं व्यापून गेल्यामुळें चोहोंकडे निबिड अंधःकार पडला होता; पाऊस धो धो पडत

होता आणि वारा असा सोसाट्यानें वहात होता कीं, त्याचा घो घो शब्द ऐकून एकाद्या धीट माणसाची ही छाती दडपून जावी.

मं. यु. पे. १९०१२.

३

श्री. ( पौष शुद्ध. )

तीर्थरूप मातुश्री बाईसाहेब वडिलांचे सेवेशीं.

अपत्यें माधवरावानें चरणी मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना. वडिलांकडून आशीर्वादपत्र घेऊन आला त्याणें सर्व आज्ञा सांगितली व पत्रांत आज्ञा मुख्य पथ्याविशीं, त्यारा आज्ञेप्रमाणें करीत आहें. परभाराही आपल्यास विदित होईल तें खरें. जेवण, औषध, मोरोचा व राजेश्वरभट यांचे सांगितल्याप्रमाणें करितों. त्यांचें औषध आहे तोंपावेतों त्यांस निमित्त ठेऊं देत नाहीं. इतक्यांत प्रकृत चांगली झाल्यास आधीं वडिलांचे सेवेशीं यावें हें मानस आहे. त्यांनही आज्ञा येईल तसें करीन. सारांश आज्ञेप्रमाणें पथ्य करितों कळावें. सदैव आशीर्वादपत्र पाठवावयास आज्ञा व्हावी. तेणें करून बरा होईन. हे विज्ञापना. रमजान.

खरे—ऐतिहासिक लेखसंग्रह.

४

अशा दुर्धर मनाची स्थिति असतांना कवीनें जे ग्रंथ केले, त्यांत त्याच्या मनाचें प्रतिबिंब उठलें आहे; परंतु त्याची प्रतिभा या अभ्रांस लौकरच एकीकडे सारून पूर्ववत—नव्हे अधिकच तेज प्रगट करूं लागली. अभ्रें असतां चंड वायूनें जी धुळधाण करून सोडिली होती, ती पाहून कवीच्या मनास विस्मय व किंचित् खेदही वाटला असावा परंतु यापुढें त्याच्या मनाची चलबिचल झालेली दिसत नाहीं. मानवव्यवहारांत नीतीचें पारडें एकंदरींत वजनदारच असतें, हलकें होत नाहीं, क्वचित् सत्यापलाप झाला तरी निदानीं ‘ सत्यमेव जयते,’ मानवानीं ईश्वरीप्रसादाचा परिमित उपभोग घेतला असतां हरकत नाहीं, मानवांच्या सर्व वासना दुष्ट, त्यांचें उच्छेदनच केलें पाहिजे, असें वचन मनुष्यजातीस कलंक लावणारें ह्मणून सर्वथैव त्याज्य होय; इत्यादि उदार विचार कवीच्या मनांत या कालीं विहार करूं लागले.

महाजनी—मोहविलसित.

५

स्वामींचें शरीर एखाद्या उत्तम मल्लाच्या शरीराप्रमाणें कसलेलें दिसत होतें आणि त्यांची कांति तर वर्णनातीत होती. मुखच्छाया तर सर्व ज्ञानांचें व इतकें ज्ञान असूनही चिरंतन शांतीचें निधान, ही मूर्ति आहे असें दर्शवी; आणि तें किती खरें होतें! त्याचप्रमाणें त्याच मुखचर्येवरून त्या पुण्यपुरुषाची निजहितनिरपेक्षता किती विलक्षण असावी आणि केवळ परहितपरायणता किती जय्यत असावी हेंहि स्पष्ट दिसत होतें. अशी ती पुण्यमूर्ति रामनामाचें पुरश्चरण करीत असतांना दृष्टीस पडल्याबरोबर शिवाजी राजास वाटलें की धन्य असो या पुरुषाची.

ह. ना. आपटे.

६

आतां ईश्वरावर मानवी स्वरूपाचा आरोप करून पूजा न करणारे, जे लोक असतात, त्यांतही दोन प्रकार आहेत. पहिला प्रकार म्हणजे धर्मविहीन मनुष्याचा. 'साक्षात् पशुः पुच्छविषाणहीनः' ही त्याची कोटि; आणि दुसरा प्रकार परमहंसांचा. हे दोन्हीही वर्ग परस्परविरोधी आहेत. एक त्या टोकास तर दुसरा त्या टोकास. या दोहोंसही एक गोष्ट साधारण आहे. ती म्हणजे ते दोघेही सगुणोपासना करीत नाहीत. पण वर सांगितलेले मानवी पशु अज्ञानामुळें करीत नाहीत, व दुसरे जे जीवन्मुक्त ते, ईश्वर हा स्वरूपांच आहे असें ज्ञान झाल्यामुळे करीत नाहीत.

भक्तियोग.

७

सूर्यास्त झाला ह्मणजे आकाशाचें हें ऐश्वर्य नष्ट झालें असें नाहीं. आकाशाच्या चांदव्याखालीं पृथ्वीवर विश्रांति घेणें व पृथ्वीचें वैभव पहाणें यासारखी दुसरी आनंददायक गोष्ट कोणती आहे? आकाशांतील तारा आपणास कांहीं तरी बोध करीत असतात. अशा तारांनी गच्च भरलेलें खगोलाचें अर्ध नेहमी आपल्या दृष्टीस पडतें. तें जर आपण लक्षपूर्वक पाहिलें तर त्यापासून आपणांस बोध व साह्य झाल्याशिवाय राहणार नाहीं. तारांच्या साह्यानें आपण ह्या पृथ्वीवरील सागरांतून मार्ग काढितों ह्मणूनच केवळ नव्हे, तर आपल्या क्षुब्धम-

नाच्या अंधारमय समुद्रांतूनही त्या आपणांस वाट दाखवितात ह्मणून त्यांचें मोठें महत्व मानिलें पाहिजे.

गाडगीळ--संसारसुख.

८

पोटांत कावळे कोरूं लागले; डोळे पांढरे होण्याची वेळ आली ! परमेश्वर बिचाऱ्याचा कसा अंतच पाहात होता. 'उभयतः पाशा रज्जु' अशी त्याची स्थिति झाली. 'अन्नपूर्णा' व 'लक्ष्मी' दोघींही त्याला हात देत होत्या. पण त्याचा हात धरिला तर सर्वच कारभार आटपणार ! काय करावें ? किंकर्तव्यविमूढ होऊन तो मनांतच देवाचा धांवा करूं लागला. मुं. यु. पे.

९

काव्येतिहास--संग्रह हें पुस्तक दोघां उपपदधाऱ्यांच्या परिश्रमाचें फळ होय, ही हल्लींच्या काळाला एक मोठी लक्षांत ठेवण्यासारखीच गोष्ट होय. कांही कालापूर्वी सुधारणा ऐन शिखरास जाऊन पोंचल्याचें जें मान दिसत होतें त्यास आता कल पडून लोकांच्या मनानें उलट खाल्याची जीं चिन्हें आलीकडे चोहोंकडे दृष्टीस पडूं लागलीं आहेत त्यापैकीच हेही एक होय. इंग्रजी ग्रथांचीं पुरश्चरणें करता करतां ज्याचें एकदाचें गंगेंत घोडं न्हालें; व या न्हाण्याबरोबर आपली अडाणी जन्मभाषा, वेडगळ आचार, अप्रयोजक व कुत्सित धर्म, या सर्वांचें पार क्षालन करून टाकून सुधारणेचीं शुद्ध तत्वे ज्यांनीं अंगीकारलीं त्यांनीं मराठी बखरी छापणें व वामन-मोरोपताचे ग्रथ प्रसिद्ध करणे हें दहा पंधरा वर्षांपूर्वी केवढें विलक्षण वाटलें असतें.

निबंधमाला--काव्येतिहास- संग्रह.

१०

फौज करनाटकांत बहुत खराब झाली. सरकारांत धान्याची महर्गता बहुत झाली. त्यामुळें खर्च फार झाला. उटें, हत्ती, घोडे व शिपाईलोक महागाईच्या सपाटयानें बहुत खराब झाले. परंतु श्रीमंतांचा पुण्यप्रताप विशेष, दैव शिकंदर; म्हणून टिपूचा मलन पार करून, यश संपादून सरकारचा मतलब साधून, तात्या पुण्यास येऊन दाखल झाले. एरवीं टिपू म्हणजे हारीस येऊन खंडणी देता अशी गोष्ट नव्हती. परंतु श्रीमंतांची पुण्याई सबळ म्हणूनच ही

गोष्ट घडली. लढाईची मर्यादा टिपूसुलतान यानें ठेविली नाहीं. लढाईचा पुरावा मोठा केला. त्या वेळेस इंग्रजांचे लष्करांत खावयास मोठी अडचण पडली. अशा समयीं परशरामभाऊ पटवर्धन यांनीं इंग्रजांवर उपकार केला. हें जाणोन, नात्यांशीं टिपूनें सल्याचीं बोलणीं लावून तह केला.

पेशव्यांची बखर.

११

वेद ईश्वरप्रणीत ह्मणजे परमेश्वरानें केलेला आणि अनादि असें आर्यांचें मत आहे. मनुष्याच्या ज्ञानास अगम्य असे जे स्वर्गादि विषय ते त्यांत प्रतिपादित आहेत. असा ग्रंथ ईश्वरप्रेरणेशिवाय होणार नाहीं हें उघडच आहे. कोणी असें ह्मणेल कीं, पृथ्वींत जे आर्यधर्माशिवाय दुसरे धर्म आहेत त्यांस अनुसरणारे सुद्धां आपापलीं आद्य धर्मपुस्तकें ईश्वरप्रणीत असें म्हणतात. त्यावर शास्त्रज्ञांचें असें उत्तर की, भाषाशास्त्रावरून व इतिहासावरून त्यांचें आधुनिकत्व स्पष्ट दिसतें व कित्येकांचे कर्तेहि ज्ञात आहेत, त्यावरून ती वास्तविक ईश्वरप्रणीत नसून तत्तद्धर्मप्रवर्तकांनीं श्रद्धादार्ढ्यार्थ त्यांस ईश्वरप्रणीतत्व सांगितलें आहे.

बापट--गद्यरत्नमाला.

१२

ज्या मनुष्यांत स्वाभिमान असतो, त्यास पराधीनपणाची मोठी लाज असते. ज्या गुणानीं किंवा कसबानें आपला निर्वाह आपणास करिता येईल, दुसऱ्याच्या तोंडाकडे पहावयाची गरज लागणार नाहीं, असा गुण किंवा असें कसब संपादण्याविषयीं स्वाभिमानी पुरुष अटत असतो. जो आज एक प्रकारचा अपमान सोसतो, त्याचा एकच प्रकारचा अपमान होऊन रहात नाहीं. एक वेळ अपमान सोसला, ह्मणजे दुसऱ्यांदा होतो, दुसऱ्यांदा सोसला, ह्मणजे तिसऱ्यांदा, ह्याप्रमाणें त्याचा अधिकाधिक अपमान होऊन शेवटीं त्यास कोणत्याही गोष्टीची शरम वाटेनाशी होते.

मुं. यु. पे. १९०५।०६

१३

श्री. ( कार्तिक व. १० )

सेवेशी. आप्पाजी त्रिंबक साष्टांग नमस्कार विज्ञापना. श्रीमंतांची स्मृति आमरणांत होती. दोन घटकानें पुढें प्राण जातेसमयीं सर्व मंडळी व वैदिक मोठे

मोठे ब्राह्मण बोलावून आणून नमस्कार केला. "महायात्रेस आह्मीं जातों. आमचे स्वारीची तयारी करा." असें सांगोन 'गजानन' 'गजानन' असें ह्मणतांच नेत्रद्वारें प्राण गेला ! त्याचप्रमाणें श्रीमंत सौभाग्यवती मातुश्रीबाईसाहेबानीं शर्त केली जवाहीर जें होतें तें आपले हातानें वांटून धर्मशिलेवर उभे राहून श्रीमंत दादासाहेबांस बोलावून आणून धाकटे श्रीमंतांस त्यांच्या हातीं दिले. 'सर्वांचें वडीलपणें यथास्थित चालवावे' ह्मणोन सांगोन (सती) गेली. (बाईसाहेबानीं) मोहराच्या पिशव्या दोन जवळ ठेऊन घेऊन जो नमस्कार करावयास आला त्यास कनिष्ठास देखील एक मोहोर दिली. बाईनीं समागमें यावें अशी पहिलीच आज्ञा. त्याप्रमाणें बाईनीं शर्त केली. हे विज्ञापना.

खरे—ऐतिहासिक लेखसंग्रह.

### १४

अव्यवस्थितपणाचा दोष पटवर्धनांस देणें, हे ज्याप्रमाणें वाजवी ठरते. त्याप्रमाणेच हैदरसारख्या शूर म्हणविणाऱ्या पुरुषानें पटवर्धनांवर छापा घालून त्यांस मारण्याचा जो यत्न केला तसा यत्न करणें खऱ्या वीरास सर्वथैव निंद्य होय हें, म्हणणेंही अगदीं यथान्याय दिसतें. कारण गफलतीनें नरडीला नख देणें हें मर्दाचें शील नव्हे, नामर्दाचें होय खऱ्या वीरानें समरांगणीं समशेर गाजवूनच मारलें पाहिजे, किंवा मेलें पाहिजे. विश्वासघातानें उन्नति करणाऱ्या पुरुषाचा पोवाडा स्तुतिगायक इतिहासकार गातील तर खुशाल गावोत, परंतु निःपक्षपाती इतिहासकारांनीं अशा बहादरास नामर्दपणाचाच दोष देणें रास्त आहे.

सहस्रबुद्धे.

### १५

मागील प्रकरणांत ज्या रात्रीची हकीकत सांगितली आहे, ती रात्र उलटून सूर्यानें आपले प्रकाशमय किरण मुलतानगडावर व मुलतानपूराच्या सभोवतालच्या झाडींतील उंच उंच शिखरांवर पसरण्यास आरंभ केला होता. सागवडच्या त्या बाजूला जरी आदले रात्रीं इतका विलक्षण तुफानी पाऊस पडला, तरी मुलतानगडाच्या व मुलतानपुराच्या आजूबाजूला आकाश अभ्रमय होण्यापलीकडे काहीही विशेष झालें नव्हतें पाण्याचा एक थेंबसुद्धां पडला नव्हता. आकाशांत ढग मात्र बरेच भरले होते. परंतु पहाटेच्या सुमाराला जो जंगी

वारा सुटला, त्यानें ते सर्व ढग पार हांकून लावून आकाशांगण बहुतेक स्वच्छ करून ठेविलें. यामुळें प्रभातकाळची शोभा मोठी मजेदार दिसत होती.

ह. ना. आपटे.

१६

समाज हा स्वाभाविकपणें ज्यास अनेक पैलू आहेत अशा खड्यासारखा आहे. असला खडा खाणींतून नुकताच काटला असल्यास, विशिष्ट आकार, सफाई किंवा तेज यापैकीं कोणतेच गुण त्यांत नसतात; पण कल्पक सुवर्णकाराकडून जसजसें त्यावर घर्षण होत जातें, तसतसें त्यास मोहक स्वरूप येत जातें. देशांतील विचारी लोक हे कल्पक सुवर्णकार होत व समाज हा त्यांच्या हातीं दिलेला पैलूदार खडा होय. या खड्यावर सरकारी सहाय्य, स्वतःचा प्रयत्न वगैरे हत्यारांनीं काम करून ते त्यास मोहकपणा आणितात. आज त्यावांचून कोणाच्या हातून कांहींच होण्यासारखें नाहीं. हें सूक्ष्म विचाराअंतीं प्रत्येक समंजस मनुष्यास समजण्यासारखें आहे. सगळे पैलू साफ झाल्याखेरीज समाज-खडा कोहिनूरप्रमाणें कधींच चमकूं लागणार नाहीं, हें ज्यानें त्यानें ध्यानांत वागवून आपापल्या पैलूवर होईल तितकी मेहनत करीत असावें, आणि मत्सर व क्षुद्र बुद्धि यांचा त्याग करून, दुसऱ्यास होईल तितका हातभार लावावा, हाच सुधारणेचा अत्यंत प्रशस्त मार्ग आहे.

निबंधसंग्रह—आगरकर.

१७

विद्वत्ता ह्मणजे सर्व गुणांचें निधान मानणाऱ्या लोकांस होमर किंवा वाल्मीकि-व्यास यांसारखे पुढें कवि झाले नाहींत या गोष्टीचें मोठें आश्चर्य वाटत असेल ! पण असें होण्याचें कारण वर जें सांगितलें आहे तें लक्षांत आणलें असतां विस्मयास मुळींच जागा राहणार नाहीं. तें मन्वंतर निराळें होतें आणि आतांचें निराळें आहे. त्या काळीं कल्पनेचेंच बहुधा प्राबल्य असल्यामुळें तसले जगद्वंद्य काव्यग्रंथ त्यावेळीं निर्माण झाले. पण आतां कल्पना जाऊन तिच्या जागीं विवेचनशक्तीचा जोर दिवसेंदिवस होत चालल्यामुळें तें सामर्थ्य गेलें, आणि नानाविध शास्त्रांचा प्रादुर्भाव झाला. पहिला काळ वसंतमासाप्रमाणें पालवीचा, मोहराचा व फुलांचा होय; आणि हा पुढील शरन्मासाप्रमाणें फलधान्यसमृ-

द्वीचा होय. तेव्हां दोहोंचें एकाधिकरणत्व ह्मणजे एका ठिकाणीं असणें वस्तु-गत्याच शक्य नव्हे !

निबंधमाला--विद्वत्व आणि कवित्व.

१८

तें पतीच्या सहवासाचें सुख पुढें पुरतें चोवीस तासमुद्धां टिकलें नाहीं. ज्या देदीप्यमान तेजोमय सौभाग्यसूर्याच्या प्रकाशात मी मोठ्या भूषणानें व खऱ्या आनंदानें एकसारखीं २७ वर्षे वागत होतें ते प्रत्यक्ष सेवा घेणारे दिव्य सूर्यरूपी पाय मला अंतरल्यामुळें अत्यंत दुःखस्वरूप निबिड अंधारांत चांचपडत राह-ण्याचा प्रसंग येऊन पोहोंचला. तो दिव्यसूर्य एकाएकीं मावळून सर्वत्र निबिड काळोख पडला. मुं. यु. पे. १९१०.

१९

येथील भूमिभाग बरेच विस्तीर्ण असून विचित्रही आहेत. कांहीं स्थलीं अत्यंत परिष्कार, सुव्यवस्था, रचनाचातुर्य व सर्व प्रकारचें कृत्रिम सौंदर्य दृष्टिगोचर होत होतें. एका भागांत एक विस्तीर्ण दीर्घिका असून तिच्यामध्यें जललतांचा अभिनिवेश केला होता.तीरप्रान्तीं आसनें मांडलेलीं होतीं व श्वेतवालुकास्तृत असे पथ योजिलेले होते. एका भागांत कन्दुकक्रीडा व कसरत करण्यासाठीं प्रागणभूमिका बनविल्या होत्या. अन्यस्थलीं वनश्रीचा प्रत्यय येत होता. दीर्घ वृक्षवाटिका, वनलताचीं स्वभावतः बनलेलीं गृहें, कुजांतर्गत असंस्कृत अशा काष्टखंडांची केलेलीं आसनें, क्षुद्र पर्वत व अल्प गव्हर यांच्या योगानें हें वनदेवतेचें निवासस्थान किंवा क्रीडा-काननच आहे कीं काय असा भास होई. मधून मधून पक्ष्यांचें कूजित व भ्रम-रांचा गुंजारव श्रुतिगोचर होई व पवनान्दोलित अशा वृक्षपर्णांचा जर्जर शब्द कर्णपथावर येऊन थडके. विलायतचा प्रवास—पावगी.

२०

कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं पार्वतीपरिणय ह्या नाटकासंबंधानें आपला फारच कडक अभिप्राय दिला आहे. तो असा 'कुमार संभवांतून अजीबात चोरलेला एकंदर मजकूर यात वजा केला असतां ग्रंथकाराचा मूर्ख-पणा व धाडसाची शर्थ हीच खालची निवळ बाकी ! ' कै. विष्णुशास्त्री चिपळूण-
[illegible] असा कडक अभिप्राय कसा देण्यांत आल

हें मात्र समजत नाहीं ! दोन्ही काव्यांत एकच गोष्ट व थोडीं समानार्थक वाक्यें हीं दृष्टीस पडल्याबरोबर त्यांनीं हें काव्य नीट रीतीनें सर्व पाहण्याचें सोडून देऊन आपलें मत असें ठाम केलें की काय कोण जाणे ?

बाणभट्ट--पारखी.

२१

झालें; याप्रमाणें ताईसासूबाईच्या रागांत भर घालून वन्सं देवघरांत गेल्यावर ताईसासूबाईचा भडिमार सुरू झाला; तो साडेनऊ वाजेपर्यंत चालू होता. त्या म्हणाल्या दिवसेंदिवस माणसांनीं अब्रू अगदीं सोडून दिली. आजपर्यंत घरांतल्या घरांतच ऐकत होतों, पण आज त्यावर कडी आहे. एवढ्या हजार दोन हजार मंडळींत बायकोनें इंग्रजी वाचलें त्याची लाज वाटली नाहीं? डोक्यावरचें पागोटें तरी राहिलें कसें ? पहिले लोक अब्रूला किती जपत असत, पण आतां ती राहिलीच नाहीं. बायकांना शिकविलें ह्मणजे त्या उद्धट होतात. त्यांच्या डोळ्यांत पाणी राहत नाहीं, ही गोष्ट खोटी काय ? पुरुषांसारखें इंग्रजी शिकून काय चाकरी करावयाची आहे? कोणतीही गोष्ट मर्यादेच्या बाहेर गेली ह्मणजे तिचा परिणाम असाच व्हावयाचा.

आमच्या आयुष्यांतील कांहीं आठवणी–रमाबाई रानडे.

२२

शिक्षित व अशिक्षित या उभयतांत सांप्रत काली एक प्रकारचें वैषम्य उत्पन्न झालें आहे. या वैषम्यास विशेष कारण कोण होत आहेत हें येथें सांगण्याची गरज नाहीं. येथें एवढेंच सांगितलें पाहिजे कीं, मूळ प्रकृति म्हणजे भारतीय आर्यत्व न सोडता, या पश्चिमात्य नवीन शिक्षणाचा, व त्याबरोबर ज्या नवीन कल्पना येत आहेत त्यांचा आह्मी योग्य रीतीनें अंगीकार करीत गेलों, तरच आमचा निभाव लागणार आहे. ह्मणून ज्या लोकांस त्यास जावयाचें नसेल त्यांनीं त्यांचें अवलंबन केलेंच पाहिजे, त्याशिवाय गत्यंतर नाहीं समाजव्यवस्थेंतील अनेक दोषस्थळें वारंवार लोकांच्या नजरेस आणावीं तीं दूर करण्याचे उपाय सुचवावे, आणि यूरोपीय सुधारणेत अनुकरण करण्यासारखें काय आहे, तें पुनः पुनः दाखवावें यास्तव हें सुधारक पत्र काढलें आहे.

निबंधसंग्रह—आगरकर.

## २३

याप्रमाणे वर्षाऋतु संपून शरदृतूस आरंभ झाला. त्यावेळीं आकाश व नद्यांचें पाणी स्वच्छ होऊन वारा शांत वाहूं लागला. ज्याप्रमाणें दुष्टांच्या संगतीनें भ्रष्ट झालेल्या सत्पुरुषांचीं अंतःकरणें सत्संगतीनें पुन निर्मळ होतात, त्याप्रमाणें ह्या ऋतूंत पावसाळ्यामध्यें गढूळ झालेलें नद्यांचें पाणी स्वच्छ होऊन त्यामध्यें कमलें उत्पन्न होऊं लागलीं. ज्याप्रमाणें गृहधनादिकांची इच्छा सोडून पापमुक्त झालेले ऋषि आपल्या समाधानवृत्तीनें शोभतात, त्याप्रमाणें ढगांतील सर्व पाणी निघून गेल्यामुळें ते आकाशामध्यें पांढरे शुभ्र दिसूं लागले. निरभ्र आकाशांत नक्षत्रें स्वच्छ दिसूं लागलीं व नक्षत्रांनीं वेष्टिलेला चंद्र आकाशास अपूर्व शोभा देऊं लागला.

मुं. यु. पे. १९०३।४.

## २४

कांहीं कलांत व विद्यांत अजरामर कीर्ति संपादून व त्या कलांचें आणि विद्यांचें बीं नवीन लोकांत लावून जुने ग्रीक लोक अंतर्धान पावले! आह्मी आमची जी थोडीबहुत पुंजी होती तिला घट्ट मिठी मारून काळाच्या तीव्र प्रहारांस न जुमानतां, आजपर्यंत कशी तरी प्राणयात्रा करीत आलों! अशा रीतीनें युगेंच्या युगें जगणें हें चांगलें, किंवा थोडींच शतकें कां होईना, पण स्वतःचें नांव अमर करून व जगाच्या इतिहासाला चांगलेपणाचें वळण लावून नाहींसें होणें चांगलें, याचा निश्चय करणें फार कठिण आहे! तथापि येवढें खास ह्मणतां येईल कीं आमच्या सुधारणेस खळ पडल्यापासून ज्या स्थितींत आह्मी कुजत पडलों आहों त्याच स्थितींत आह्मांस युगेंच्या युगें लोटावयाचीं असतील तर आह्मी एकदम नाहींसें व्हावें हें इष्ट आहे.

निबंधसंग्रह—आगरकर.

## २५

आकाश रविप्रकाशमय नसून धूमिकावृत होतें, वातावरण सुखसंवेदक व उल्हासजनक नसून दुःखसंवेदक व उद्वेगकर होतें. प्रदोषसमय सुखकर नसून शैत्यसंस्कारयुक्त होते व अर्थात् जनमनास उपभोगप्रवण न करितां सुखास्वादपराङ्मुख करीत होते. आमच्या पथिकाश्रमाच्या समोरच विस्तीर्ण उद्यानभूमिका होत्या, परंतु आम्ररसासवानीं मत्त झालेल्या अशा कोकिलांचें श्रुतिसुख कूजित ऐकूं आलें नाहीं व कमलाभोंवतीं गुंजारव करीत भ्रमण करणारे समद मधुकर दृग्गोचर झाले नाहींत.

मुं. यु. पे. १९१०.

# तिसऱ्याभागामधील कठीण शब्दांवर टीपा.

## ( पद्य )

२

करांबुजयुगीं:—कमला सारख्या सुंदर हातांनीं. मधुमालिका:—उत्तममाळ. विदेहबालिका:—सीता. कंदर्प:—मदन. कंदर्पाराति:—मदनशत्रु, शंकर. दाक्षायणी:—दक्षकन्या ( पार्वती ). निर्जरनाथ:—इंद्र. सत्यलोकनाथ:—ब्रह्मदेव. कंधरीं:—गळ्यांत. वृंदारकवृंद:—देवांचा समुदाय. संफुल्ल:—फुललेली. मल्लिका:—मालती. हर्षोत्कर्षे:—अत्यानंदानें. आनंदनंदहृदयारविंद:—आनंदतनय कवीचें हृदय हेंच कमळ.

३

आयत:—लांब. विस्तीर्ण:—रुंद. कपि...गत:—वानरसेनारूप उत्तर सागरांतून निघालेला कालाहि ( कालसर्प ). रात्रिंचर:—राक्षस. एणी:—हरिणी. विश्वशरण्य:—सर्व जगास शरण जाण्यास योग्य ( राम ). साजनाश्रुपथ:—( स+अंजन+अश्रु+पथ. ) काजळानें युक्त अशा अश्रूंची ओळ. सागरोर:—सागराचें हृदय. हा सेतु म्हणजे रामानें समुद्राचा पराभव केल्यामुळें त्यास जें दुःख झालें त्या दुःखरूप अग्नीनें जाळून टाकिलेलें त्याचें हृदयच आहे. ( सेतु काळा होता आणि समुद्राचें हृदय दुःखानें काळें पडलें होतें म्हणून दोहोंत साम्य. ). रामवानरानीं रचलेल्या सेतूवर कवीनें या उत्प्रेक्षा केल्या आहेत.

५

पंचानन—सिंह. वैराग्याचे पंचानन—ज्यांचें वैराग्य कडकडीत आहे ते. चंडकीर्ण—सूर्य. हुताश—अग्नि. पद्महस्ती—दैवशाली; ज्यास कधीं अपयश येत नाहीं व ज्याच्या योगानें सर्वांस सुख मिळतें तो. जीव पावे स्वपदासी:—( स्व+पद ) जीवात्म्याचें परमात्म्याशीं ऐक्य होतें. पंचभुतासीं:—पांच पिशाचें, पक्षी, पृथिव्यादि पंचमहाभूतें. गोपूर:—नगर वेशीवर बांध-

गी उंच इमारत. अरुष:—नीरस, मूर्खपणाचें. थिल्लर+उदक:—डबक्यां-ल पाणी. कनकाद्रि:—मेरुपर्वत. अजाक्षीर:—शेळीचें दूध. निंबोळ्या—ड्डलिंबाच्या बिया.

७

योगिनी:—योगाभ्यास करणारी संध्या. विरक्त:—संसारास विटलेला, पक्षीं बडा. रंजवी वासरा:—दिवसास शोभा देते. घनघोरघर्घररवा:—मेघासारखा भीर व कठोर आहे शब्द ज्याचा अशा समुद्रा. अनंत:—सागर अनंत असून ग्राचा अंत लागत नाहीं अशा प्रभूची आठवण करून देतो. हर्षनिमिलितें यनें:—हर्षानें डोळे मिटतात. चिद्घन मनीं वर्षे:—ज्ञानमेघ ( ईश्वर ) मनांत र्षतो. वृत्ति इ. माझी वृत्ति तन्मय झाली तशी, बाळा ! तुझी झालीशी दिसत हीं, तरी असें कोण ह्मणेल कीं तुझ्या हृदयांत प्रभु वास करीत नाहीं ? असा रुष निर्वाच्य दांडगाच समजावयाचा !

८

घृतसरिता:—तुपाच्या नद्या. पायसान्न:—खीर; शिखरणी:—केळ्यांची शेकरण. ओदन:—भात. वरान्न:—वरण. नवनीत:—लोणी. द्रोणाचळ—ोणागिरी. शाका:—भाज्या. अमरनाथ:—इंद्र. ( इंद्रानें पर्वतांचा पक्षच्छेद केला रंतु या ठिकाणीं जे पर्वत सांगितले आहेत त्यांचा पक्षच्छेद तो करूं शकला ाहीं ). अर्जुनरूपें—अर्जुन हा इंद्राच्या वरानें झालेला कुंतीपुत्र.

९

अन्वय:—त्या पदाब्जीं भ्रमरमन विरामा पाववी ( स्थिर कर ). भव+चाप+ध्वंस:—संसाररूपी चापाचा ध्वंस करणारा. सर्व घटांचें मूळ कारण जशी माती आहे त्याप्रमाणें तूं सर्व जगाचें कारण आहेस. मातीं—राहणार नाहींत. त्या सिंधुच्या बिंदुमात्रा निरूपीन:—तुझ्या अगाध गुणांचें लेशमात्र वर्णन करीन. मात्रा:—औषध. अविद्या:—माया. क्षितिलोकवाणीं:—मराठीभाषेंत.

१२

अनुष्ठानें:—देवास प्रसन्नकरण्यास अभिषेक आर्वतनें वगैरे करणें. त्वन्नाथाच्या:—शंकराच्या. स्व+सुत+गद+शात्यर्थे:—आपल्या मुलाच्या रोग-निवारणार्थ.

१३

पूर्वीजवः—पूर्वीच्या ग्रंथकारांचें सरलत्व.छंदोग्रंथः—वृत्तदर्पण. तुर्के नः—करितां येत नाहीं. निघंटः—शब्दकोश. काव्यक्रियाः—काव्यांतील मर्मे. सारस्वतप्रक्रियाः—सारस्वत व्याकरण. प्रक्रियाः—व्याकरणांतील व्युत्पत्तिप्रकरणास प्रक्रिया ह्मणतात.

१४

'देवांनीं पुष्पांजुळी वर्षेती' हा प्रयोग अशुद्ध आहे. वर्षेली असें पाहिजे, परंतु खालच्या ओळींतील 'सती' शब्दाशीं यमक जुळण्यासाठीं कर्वानें 'वर्षेती' असें केलें आहे. पतिव्रताः—या ठिकाणी 'व्र' हें जोडाक्षर पुढें आल्यामुळें 'ति' गुरु होतें परंतु वृत्तसुखार्थ तें लघु ह्मणावें लागतें हा दोष आहे. वुंथीः—पांघरूण. मयजाः—मंदोदरी. ज्येष्ठस्नुषाः—सुलोचना. वडिल पुत्रः—इंद्रजित्. घोळवून त्याची वाट लावून.

१५

अवधारीः—लक्ष देऊन ऐक. त्रिविध तापः—अधिभौतिक अधिदैविक; व अध्यात्मिक. वमन —ओकारी. पदार्थमात्रः—कोणताही पदार्थ.

१६

डोळसः—सुंदर. वासरमणिः—सूर्यः

१८

मनोधामींः—मनांत. कृशानुः—अग्नि. अमूर्त—अदृश्य. शिखाः—ज्वाला.

१९

मंडपघसणीः—मांडवांत शिवाशिव. येरीः—दुसरी ( वेश्या ). लाधलीः—गढली. विटंबिलीः—थट्टा केलीस. कांसोटीः—लंगोटी. आत्मदृष्टिः—आत्मज्ञान. ताडातोडी शेंडी काढणें व जानवें तोडणें. भगवीं लुगडींः—भगवां वस्त्रें. उपाधीः—बाह्य अवडंबर. गार्ढीः—नाहीशी कर. निजांधुः—आत्मज्ञानावांचून अंध.

२०

स्थिरावलाः—स्वस्थ राहिला. गणक—जोशी. गज+उष्ट्र+रथ+तुरग+पदाति (पायदळ)+दल(सैन्य).तयेंः—त्यानें.संभ्रमेंः—आदरानें.सीमान्तीं वरदेव पूजिलाः—नगराच्या हद्दीवर नवरदेवाचें पूजन केलें. नारायणस्वरूपीः—ईश्वर ह्मणून.

सावित्रीस्वयंवृतः—सावित्रीनें निवडलेला. सकल...मंडितः—सर्व गुणांनीं युक्त. तापसजनपरिवृतः—ऋषिमडळीत असलेला. द्युमत्सेनासमवेतः—द्युमत्सेना बरोबर. तुर्य...नंदितः—तुताऱ्याचे आवाज व वेदमंत्राचा घोष यांनीं ज्याचें गौरव केलें आहे असा. अग्निसाक्षिकः—अग्नि ब्राह्मण व कुलदेवता यांच्या समक्ष. सालंकृतः—अलकार घालून.

२१

तळीं वोटविती माथे.—त्याच्या खालीं आपलीं डोकी घालूं लागलीं. मिनलेः—एकवटले. बालार्कः—सकाळचा सूर्य. रातोत्पळेः—तांबडी कमळें. संवाहानताः—रगडतां. सामुद्रिकेंः—हस्तपादावरील रेषा.

२२

बाडवारः—महिमा. स्वरूपाची स्थितिः—आत्मज्ञान. पडीभरः—आसक्ति.

२३

चावटः—चावटपणा. वटवटः—वडवड. जगजेठीः—जगच्छ्रेष्ठ. चाट—हलकट लोक. गव्हारः—रहस्य.

२४

ऊगमाचाः—आपण आलों कोठून या गोष्टीचा. बाधिजेना+आपदा. अविद्यागुणेंः—मायेच्या योगानें

२५

पादसरोरुहींः—पदकमलीं. गोंवूंः—अडकवूं; गुणगीतरक्तः—गुण हेंच गायन त्याच्या ठिकाणी रममाण. हरिण गाण्याला लुब्ध होतें अशी ख्याति आहे. सैंधवः—मीठ. विरावेंः—विरघळावें. चिटावेंः—दूध प्यावें.

( गद्य )

१

व्याकरणाच्या...होईलः—व्याकरणाहून रूढीचें प्राबल्य जास्त आहे. ( शास्त्राद्रूढिर्बलीयसी. ) वैयाकरणः—व्याकरणकार. बांधीलः—अंकित, स्वाधीन.

३

वडिलाकडून......सांगितलीः—आपलें आशीर्वादाचें पत्र पोंचलें. जासुदानें सर्व हेतु कळविला. परभारेंः—दुसऱ्या माणसाकडून. निमित्त ठेऊं देत नाहींः—मी पथ्यकरीत नाहीं अशा तक्रारीस त्यांस जागा ठेवीत नाहीं.

४

दुर्धरः—वाईट. त्यांत...आहेः—त्या नाटकांवरून त्याच्या मनाच्या स्थितीचा स्पष्ट बोध होतो. प्रतिभाः—कल्पनाशक्ति. चंडः—जोराचा. धुळधाणः—नासाडी. नीतीचें...असतेंः—नीतिमान मनुष्यास मान मिळतो. सत्यापलाप झालाः—(सत्य+अपलाप) खरें मागल्याटेंग पडलें. सत्यमेव जयतेः—सत्याचा जय होतो. ईश्वरी प्रसादः—ईश्वरानें दिलेली देणगी. परिमितः—नेमस्त. वासनाः—इच्छा. उच्छेदनः—समूळ नाईनाट. कलंक लावणारेः—अपकीर्तिकारक. विहार करूं लागले—फिरूं लागले.

५

मल्लः—पेहलवान. कसलेलेंः—पिळदार. वर्णनातीतः—अवर्णनीय. मुखच्छायाः—तोंडावरील तेज. चिरंतनः—अक्षय. निधानः—माहेरघर. निर्जहितनिरपेक्षताः—आपल्या हिताबद्दल बेफिकीरी. जाज्वल्यः—जाज्वल्य; उत्कट. पुरश्चरणः—मंत्रसामर्थ्य मिळविण्यास मंत्रशास्त्रांत सांगितल्याप्रमाणे पाठ म्हणणें व इतर विधि करणें. परहितपरायणताः—परोपकारांत तत्परता.

६

ईश्वरावर...करूनः—ईश्वराचें रूप मनुष्यासारखें आहे असें समजून. साक्षात्...हीनः—पुच्छ व शृंग विरहित प्रत्यक्ष पशूच. कोटिः—वर्ग. परमहंसः—जीवन्मुक्त. परस्परविरोधीः—एकमेकांविरुद्ध. एक...टोंकासः—दोघांत जमीन अस्मानाचें अंतर; साधारणः—दोघांत असणारी. सगुण+उपासनाः—मूर्तीची भक्ति. ईश्वरस्वरूपी आहेः—आपणच ब्रह्म आहों.

७

ऐश्वर्यः—शोभा. आकाशाचा चांदवाः—नभोमंडल; क्षुब्धमनः—विकारांनीं अस्वस्थ झालेलें मन. ताराच्या...दाखवितातः—नक्षत्रांचें अवलोकन केल्यानें जलपर्यटनास मदत होते एवढेंच नव्हे तर मनःशांतीस ही मदत होते.

८

पोटांत...लागेल. भुकेनें व्याकुळ झाला. डोळे...आलीः—प्राण जातो कीं काय असें वाटलें. अंत पहाणेंः—सत्व पहाणें. उभयतः पाशा रज्जुः—

एकीकडे आड आणि दुसरीकडे विहीर; पेंचाटींत सापडणें. अन्नपूर्णा:—धान्याधिष्ठित देवी. अन्नपूर्णा...होत्या—त्याला अन्न व पैसा मुबलक मिळत होता. कारभार आटपणें:—सर्वस्वी नाश होणें. किंकर्तव्यमूढ—काय करावें हें न सुचणें.

९

उपपदधारी:—पदवीधर. ( बी. ए. एम. ए. वगैरे ). कल पडणें—कमी जोर होणें; उलट खाणें:—प्रवृत्ति बदलणें. पुरश्चरणें:—पारायणें. गंगेत घोडे न्हाणें:—इतिकर्तव्यता होणें. कुत्सित:—निंद्य.

१०

दैव शिकंदर:—नशीब जोरावर असणें; टिपूची मसलत पार करून:—टिपूनें आणलेल्या कचाटांतून मुक्त होऊन. हारीस येणें:—शरण जाणें मर्यादा ठेविली नाहीं:—शिकस्त केली. लढाइचा मोठा पुरावा केला:—लढाईचा नेट केला.

११

अगम्य:—न समजाणारे. प्रतिपादित आहेत:—सांगितले आहेत ईश्वर—प्रेरणेशिवाय:—दैविक स्फूर्तीशिवाय. आधुनिकत्व:—अर्वाचीनता; ज्ञात:—माहीत. तत्तद्धर्मप्रवर्तकांनीं:—त्या त्या धर्माच्या चालकांनी. श्रद्धदार्ढ्यार्थे:—विश्वास कायम बसावा ह्मणून. त्यांस ईश्वरप्रणीतत्व सांगितलें आहे:—ते ईश्वरानें केले आहेत असें ह्मटलें आहे.

१३

आमरणांत:—मरेपर्यंत. महायात्रा:—काशीयात्रा; ( या ठिकाणीं मृत्यु ) धर्मशिळा:—आपल्या मृतपतीबरोबर सहगमन करणारी स्त्री चितेवर ज्या पायरीवर पाय देऊन चढते तिचा धोंडा. धाकटे श्रीमंत:—नारायणराव.

१४

अव्यवस्थितपणा:—निष्काळजीपणा छापा घालणें:—एकदम गुपचुप हल्ला करणें. गफलतीनें:—बेसावध असतां नरडीला नख लावणें:—प्राण घेणें. पोवाडा गाणें:—फार प्रशंसा करणें. स्तुतिगायक:—पक्षपाती.

१५

पैलू:—तास. कल्पक:—चतुर. सुवर्णकार:—सोनार. प्रशस्त:—योग्य.

१७

मन्वंतरः—काळ. जगद्वंद्यः—सर्वमान्य. विवेचनः—चिकित्सा.

१८

देदीप्यमान–तेजस्वी. सौभाग्य हाच सूर्य; तो...झाला–ते तेजःपुंज पतिराज एकदम निवर्तल्याबरोबर मला सर्व जग शून्य भासूं लागले.

१९

परिष्कारः—शोभा. दीर्घिकाः—विहीर. ऊर्मिनिवेशः—लावणी. तीरप्रांतीं:—काठांवर. श्वेतवालुकास्तृतः—पांढरी वाळू ज्यांवर पसरली आहे असे. कन्दुकक्रीडाः— चेंडूफळीचा खेळ. वाटिकाः—राई. कुंजांतर्गतः—गर्द झाडींत असलेलीं. असंस्कृतः—ओबडधोबड. अल्पगह्वरः—लहान गुहा. कूजितः—आवाज. श्रुतिगोचर होई:—ऐकूं येई. पवन+आन्दोलितः—वाऱ्यानें हलविलेलें. कर्णपथावरः—कानावर.

२०

सहृदयः—मार्मिक; रसज्ञ. समानार्थकः—सारख्या अर्थाची.

२४

त्याच्या डोळ्यांत पाणी रहात नाही.—त्या निर्लज्ज बनतात.

२५

धूमिकावृतः – धुक्यानें भरलेलें. सुखसंवेदकः—सुखदायक. उद्वेगकरः—उदास करणारे. प्रदीपसमयः—दिवे लावण्याची वेळ. शैत्यसंस्कारयुक्तः—थंडी ज्यांत आहे असे. सुखास्वादपराङ्मुखः—उपभोग घेण्याची त्यांस इच्छा नव्हती. पांथस्थाश्रम—प्रवाशांस उतरण्याची गृहें. आम्ररस+आसवाः—आंब्याचा रस हीच मदिरा. श्रुतिसुखः—कर्ण मनोहर. कूजितः—कू कू शब्द. समदः—मत्त प्रवणः—उत्सुक.

— —

*

# शुद्धिपत्र.

| पान. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| १० | १७ | अनुसूया | अनसूया. |
| १४ | १३ | तात्पयार्थ | तात्पर्यार्थ. |
| ३१ | १ | विज० | निज. |
| ३८ | ११ | वालावो | वोलावो. |
| ४० | १५ | योगागें | योगानें. |
| ४७ | १५ | बाबा० | नाना० |
| ,, | १६ | घराण्याचा | घराण्याच्या. |
| ५१ | १४ | शरपणा | शूरपणा. |
| ५२ | १ | कालोधींत | कालोदधींत. |
| ,, | १६ | मस्नयेकं | मनस्येकं. |
| ५४ | १७ | विलुत्प | विलुप्त. |
| ६५ | १२ | हृग्दत | हृद्गत. |
| ६८ | २० | त्याला चंद्राची | चंद्राची त्याला |
| ६९ | २० | वुर्णसांत | वुर्णुसांत. |
| ७६ | २७ | तो | ती |
| ८७ | २६ | चिद्धन | चिद्घन. |